## खुलासा

श्री. पुंडलीकजी कातगडे यांना लिहिलेलीं हीं माझीं पत्रें छापण्याची परवानगी मी दिलीच नसती. पुढें मागें तीं छापलीं जातील अशी कल्पना लिहितेवेळी मुळींच नव्हती. हीं पत्रें पुंडलीकजींनीं संभाळून ठेवली आहेत, हेंही मला ठाऊक नव्हतें. पण '४२' च्या आंदोलनांत मी जेलमध्यें असतांना यांतील कांहीं पत्रांचीं छापील कात्रणें मला पहावयास मिळालीं. पत्रें छापलीं जातातच; तर निदान जो मजकूर प्रगट होणें अनिष्ट आहे तेवढ्याची काटछाट करावी, अेकादा शब्द सुधारावा, आणि अेकादें वाक्य पुढें मागें करावें, असें वाटून 'तूर्त पत्रें न छापाल तर बरें' असा निरोप मीं पाठविला आणि आलेलीं कात्रणें नमुन्या-दाखल सुधारून पाठविलीं.

झालेल्या सुधारणा बऱ्याच आवडल्या म्हणूनच श्री. पुंडलीकजींनीं हीं पत्रें छापण्याचें थांबविलें. तुरुंगांतून बाहेर आल्यानंतर त्यांच्याच तोंडून बेळगांवच्या अेका सभेंत अेकलें कीं, त्यांनीं माझ्या कांहीं पत्रांतील सडेतोडपणावर किंवा कठोरपणावर चिडून तीं फाडून टाकलीं. तरीहि बरींचशीं पत्रें त्यांनीं संभाळून ठेवलीं आहेत आणि आतां तीं जशींच्या तशीं छापण्याचा त्यांचा विचार आहे. श्री. पुंडलीकजींचा व माझा संबंध अितका जिव्हाळ्याचा आहे कीं त्यांचें कोठेंही चुकलें कीं, ताशेरा झाडण्यास मी कमी करीत नाहीं आणि त्यामुळें कधीं कधीं ते रागावले तरी आजवर कधीं त्यांनीं गैरसमज करून घेतला नाहीं. माझी ही काकागिरी त्यांनीं जरी सहन केली तरी लोकांपुढें ती अुघडी करणें मला शोभणार नाहीं म्हणून, हीं पत्रें संपादून त्यांतील सर्व भाग सौम्य करावा असें मी मनानें ठरविलें होतें. पण पुंडलीकजींचें म्हणणें पडलें कीं, तसें केल्यानें पत्रांचा स्वाभाविकपणा नष्ट होअील. प्रेमानें आणि आपुलकीनें लिहिलेली भाषा समजण्या-अितके वाचक सुबुद्ध असतातच. पुंडलीकजींनीं जर गैरसमज करून घेतला नाहीं तर, वाचक तसा तो करून घेतील असें मी काय म्हणून मानावें ?... असा मनाशीं विचार करून मी तो भाग तसाच राहूं दिला.

अितर कांहीं व्यक्ति किंवा संस्था यांच्याविषयीं प्रगट केलेले अभिप्राय देखील होतां होअील तों ठेवावेत असा पुंडलीकजींचा आग्रह होता. ( त्यांत त्यांचें काय

जातें ! कोणी चिडले तर माझ्यावर चिडणार ! ) तेव्हां त्या वाचतांत मात्र अर्धे त्यांचें खरें आणि अर्धे माझें खरें, अशी तडजोड करावी लागली.

यांतून अेक प्रश्न निघाला. पत्रावर मालकी कोणाची ? कोणीसें सांगितलें कीं पत्रांवरील कायदेशीर मालकी लेखकाची नसून पावकाची असते. ( ज्याला पत्रें पावतात तो पावक ) पण तीं *छापावयास देण्या न देण्याचा* अधिकार लेखकाचा असतो. हा अधिकार अर्थातच लेखकाला जिवंतपणींच वापरतां येतो. म्हणून लेखकाला पावकाशीं तडजोड करावी लागली. अर्थं त्यजति पंडितः ! आणि पुंडलीकजीही *नाखिलाजानें का होअीनात, लेखकाच्या आणि प्रकाशकाच्या* आग्रहाला वश होण्यास तयार झाले, आणि त्यांनीं थोडीफार काटछाट होअूं दिली.

खाजगी पत्रें आणि तींही बारा पंधरा वर्षांवर किंवा *त्याहूनही अधिक* कालावर पसरलेलीं अेकत्र छापतांना निदान कालक्रम तरी संभाळला पाहिजे. दुर्बोध ठिकाणीं तळटीप दिली पाहिजे; तसेंच महत्त्वाचे प्रसंग असतील तर ते थोडेसे विस्तारानें समजविले पाहिजेत; *अुल्लेखलेल्या व्यक्तींची अुपयोगी असल्यास* माहितीही दिली पाहिजे; खरोखर संपादन करावयाचें म्हणजे हें सर्व केलें पाहिजे. पुंडलीकजींनीं माझीं पत्रें जशीं सांभाळून ठेविलीं तशींच मला लिहिलेलीं स्वतःचीं पत्रें नकलून ठेविलीं असतीं तर त्यांतीलही आवश्यक अुतारे देणें जरूरीचें होतें. पण त्यांचीं पत्रें त्यांच्याकडे किंवा आज माझ्याकडे मिळणें शक्य नव्हतें. पत्रांचा काल [illegible]

मूळ [illegible]

आग्रह असतो. पण माझ्या भ्रमंतीमुळें तसें करणें सोपें नव्हतें आणि प्रकाशकही स्वतःचा छापखाना नसल्यामुळें परस्वाधीन. अशा स्थितींत *' तुम्ही काळजी करूं नका, आम्ही पाहून घेअूं. '* असें आश्वासन देअून पुंडलीकजींनीं आणि प्रकाशकांनीं मला मोकळें केलें. आणि आतां पुस्तक हातीं आल्यानंतर पाहातों तर दिलेलें आश्वासन *मुमुर्षुजनांना अंतघडीला दिलेल्या आश्वासनाअितकेंच* पाळलें गेलें आहे. अेक संबंध पत्र निरनिराळ्या ठिकाणीं दोन वेळां छापलें गेलें आहे. कर्नाड सदाशिवरावांना कर्नल सदाशिवराव बनविलें आहे. अेवढीं दोनच उदाहरणें दिलीं तर बस आहेत. श्री. पुंडलीकजी पुष्कळ कामें अंगावर घेतात, अंग मोडून आणि जीव तोडून तीं पार पाडतात; पण त्यांच्या ' चालेल कीं ' मुळें त्यांच्या श्रमाच्या आणि

निष्ठेच्या मानानें फळ त्याच्या पदरीं पडावें तितकें पडत नाहीं हा दोष वाटतो तितका लहान नाहीं तो दोष घालविलाच पाहिजे

श्री पुडलीकजी हे मूळचे मिरजेचे रहाणारे तेथील युवराजाच्या सगनीत शाळेंत शिकलेले पुढें त्याना देशभक्ति सुचली बड करून क्रांति करावी, राज्यकर्त्याविरुद्ध कट करून कित्येकांचे खून करावेत, अशा दहशतवादी विचारांनीं त्यांच्या बाल मानसांत ठाणें दिलें पुढें राणाय विचारांचीं प्रवचनें देणाऱ्या कालनकाराच्या शिफारशीनें ते कर्नाटकचे पुढारी श्री गगाधरराव देशपांडे यांच्याकडे राहिले तेथें रूढ अर्थाचें शिक्षण होत नाहीं म्हणून असंतुष्ट होअून ते काशी-बनारसपर्यंत जाअून आले, पण कोठेंच जम बसेना म्हणून बेळगांवला गगाधररावांच्याकडे परत गेले गगाधररावांनीं गांधींमार्ग स्वीकारला आणि रचनात्मक कार्यक्रमासाठीं स्वतःच्या गांवीं 'आश्रम' काढला तेव्हां खादी वगैरे केवळ रचनात्मक कार्यांत रहाणें पटेना म्हणून श्री पुडलीकजींनीं पुन गगाधररावांना सोडलें आणि गीता व अुपनिषदें यांवर प्रवचनें देत ते महाराष्ट्र व वऱ्हाडमध्यें हिंडले पुढें बिहारमध्यें चपारण्य जिल्ह्यांत गांधीजींच्या आज्ञेनुसार अेक वर्षपर्यंत त्यांनीं निर्भयपणें खेडुतांची सेवा केली श्री पुडलीकजींचा गांधीजींशीं प्रथम सबंध आला तो चपारण्यामध्यें त्यानतर गांधीजींच्या सत्याग्रहाश्रमांत आणि गांधीजींच्या दौऱ्यांत केव्हां केव्हां श्री पुडलीकजी येअून रहात असत त्यानतर कांहीं महिने साबरमती येथें गांधीजींच्या आश्रमांत खादीविद्या आणि शौचकूप साफ करण्याची कला त्यांना शिकून घ्यावी लागली गांधीजींना साक्षी ठेवून देशसेवेसाठीं त्यांनीं सत्य व स्वराज्य मिळेपर्यंत ब्रह्मचर्य हीं व्रतें घेतलीं

गगाधररावांची व्यक्तिगत सेवा करावी, सभा-परिषदा भरविण्यात हातभार लावावा, तशीच सधी साधल्यास सभेंत भाषणेंही करावींत, आणि अशा रीतीनें हळूहळू 'पुढारी होण्याच्या' मार्गास लागावें, अशी त्यांची त्या वेळी माथमिक महत्त्वाकांक्षा होती पण थोरथोर लोकांचा सहवास लाभल्यामुळें, गगाधररावांच्या बरोबर सबंध हिंदुस्थानचा प्रवास झाल्यामुळें, आणि गगाधररावांच्या रूपेनें अनेक लहानथोर चळवळींमध्यें व सार्वजनिक कार्यामध्यें, गोविंदराव याळगी-सारख्या अव्वल दर्जाच्या देशभक्तांच्या हाताखालीं कांहीं वर्षे व पुढें स्वतत्रपणें जबाबदारीनें काम करण्यास मिळाल्यामुळें, पुडलीकजींचा जीवनाचा व महत्त्वा-

कासेचा अुथळपणा राहू शकला नाहीं हिंदी शिकून राष्ट्रभाषेचा प्रचार करावा, त्यासाठीं व्याकरण, कोश आणि पाठ्य पुस्तकें लिहावींत आणि वर्ग चालवावेत ही प्रवृत्ति त्यांनीं अुत्साहानें व नेटानें पुष्कळ वर्षें चालविली बेळगांव जिल्ह्यामध्यें राष्ट्रभाषेच्या कार्याचें बीज पेरून त्याला कांही वर्षें त्यांनीं खतपाणी घालण्याची काळजी वाहिल्यानंतर, आता त्याचा वृक्ष बनून त्याला पालवी, फुलाफळांची बहार आलेली पहावयास मिळते

आअीला जसें आपल्या लाडक्या मुलाचें वेड असतें, तसें पुंडलीकजींना लहानपणाच्या तालमीचें वेड अजूनपर्यंत आहे तालमीला ते तालीम संस्था म्हणतात बाळपणच्या संस्थेविषयींचा हा अनुराग जरा मला अतून आवडतो तरी या पत्रांमधून तो माझ्या टीकेचाच विषय झाला आहे. कारण गंगाधररावांची सेवा आणि तालमींची सेवा या दोन गोष्टी परस्परबाधक झाल्यावाचून राहणार नाहींत हें मला स्पष्ट दिसत होतें आणि दुसरी गोष्ट अशी कीं पुंडलीकजी राजकारणांत पडले म्हणून त्यांची अखंड सेवा पचवून त्यांना मात्र तालमीपासून शक्य तितकें दूर ठेवावयाचें धोरण एका काळीं जुन्या संचालकाचें असे अितर पुष्कळ बाबतींत हनुमानाप्रमाणें बलभीम बनणारे हे लोक सार्वजनिक तेजस्वितेचा विचार करीत नाहींत, याचें वाअीट वाटून मी पुंडलीकजींना टपका देत असें

पुंडलीकजींनीं स्वकुटुंबियांशीं असलेला संबंध अेकेपरी तोडला आहे तें वातावरण मुळांतच करुण होतें त्यांतच त्यांनीं देशसेवेचें व्रत घेतलें यामुळें कुटुंबियांविषयींचा मोह तोडण्यांत त्यांना मदत करणें अिष्ट होतें मध्यंतरीं कांहीं अिष्टमित्रांनीं त्यांना लग्नाच्या जाळ्यांत पकडण्याचा विचार केला आणि तेही फसण्याच्या बेतांत आले होते त्या वेळीं मी चांगलीच दृढता वापरून त्यांना परावृत्त केलें आणि कित्येकांचे शिव्याशाप मिळविले त्या वेळीं जर मला आजच्या अितका अनुभव असता, तर त्यांना लग्नांतून परावृत्त करण्याचा प्रयत्नच मी केला नसता हें मला कबूल केलें पाहिजे ब्रह्मचर्याचें पालन कोणीही स्वतःच्या निर्धारावरच करावयाचें असतें भावाभावांच्या वांटणीच्या बाबतींत आणि इतर व्यवहारांत पुंडलीकजींनीं निःस्पृह वृत्ति धारण केली होतीच, पण स्वतःचें शेत बळकावून बसणाऱ्या भाअुबंदांकडून तें परत मिळविण्यासाठीं सहज साधणारें खोटें न करतां, त्यांनीं आपलें शेत जाअू दिलें

त्यांनी स्वतःच्या हिंमतीवर चालविलेला राजकीय लढा म्हणजे मिरज संस्थानातील सारावाढीविरुद्ध रयतेकडून करविलेला 'सत्याग्रह' हा होय. याचा अुल्लेख अेकदोन पत्रांत आला आहे या यशस्वी लढ्यानंतर जर पुडलीकजींनी संस्थानी राजकारणांतच रहावयाचें ठरविलें असतें तर ते आज प्रजा मंडळांत चमकले असते पण त्यांना गंगाधररावांची सेवा सोडावयाची नव्हती.

श्री गंगाधररावांच्या हुदली या अनामी गांवात पुडलीकजींनी स्वतःच्या हिंमतीवर पैसे मिळवून आणि कर्ज काढून अेक कॉलेजचं व्यायामशाळा बांधली त्यानंतर गांवातील लोकांना संघटित करून, गावकऱ्यांचे आणि त्यांच्या बैलांचे हाल दूर करण्यासाठी, गांवकऱ्यांच्याच हातून गांवचे मुख्य रस्ते दगडांनीं बांधवून घेतले गावच्या हरिजनांसाठीं अेक विहीरही खोदवून दगडांनीं बांधवून घेतली आहे

हुदलीच्या आसपासच्या खेड्यांतील दरोडेखोर बेरड लोकांना धंदा शिकवून प्रामाणिकपणें पोट भरण्यास शिकविण्याचें काम पुडलीकजी सध्या करीत आहेत. मधून मधून शिक्षणशिबिरें अुघडून तरुण कार्यकर्त्यांना देशाची आणि देश सेवेची माहिती देण्याचें काम ते करीत असतानाच श्री गंगाधरराव देशपांडे महाराष्ट्र व कर्नाटक दोन्ही प्रांतांचें पुढारीपण करीत असताना, श्री पुडलीकजी त्यांच्या सेवेंत त्यांच्याबरोबर सतत असल्यामुळें त्यांना अनेक तऱ्हेचा विविध अनुभव मिळालेला असून, त्या सर्व अनुभवांचा अुपयोग हुदली गांवच्या सेवेलाच असड चिकटून राहून करावयाचा असें त्यांनीं ठरविलें आहे

मी जर बेळगांवच्या बाजूला काम करीत असतों, तर श्री. गंगाधररावांशी आणि अर्थात् पुडलीकजींशीं माझा संबंध यापेक्षांही अधिक आला असता पण मी कर्नाटक महाराष्ट्राच्या बाहेरच नेहेमीं राहिल्यामुळें आमचा परस्पर ओढा आणि बराचसा परिचय पत्रोपत्रींच झाला आहे अेकत्र काम केल्यानें परिचय गाढ होतो, आणि ओढा वाढतो किंवा तुटतो, आम्हीं दोघे दूर असल्यामुळें या गोष्टी घडल्या नाहींत पुडलीकजींच्या स्वभावांतील कांहीं अुत्कट बाजू आणि क्षितिरेक दोष माझ्या नजरेबाहेरच राहिले असतील कित्येक परोपकारी स्नेही असलेले नसलेले कितीतरी दोष कानांत येअून सांगतात पण हा रतीब अितका कांहीं मुबलक असतो कीं त्यापैकीं कांहींच डोक्यांत टिकत नाहीं, पोटांत शिरून तें पचण्याची गोष्ट तर दूरच राही

समग्र ग्रामसेवेचें काम स्थानिक लोकांनाच परवून आणि त्यांनाच तयार करून नांवारूपास आणण्याचें ठरविलें आहे चेळगाव आणि हुबळी यांच्यामधील सुरत कप्याच्या डोंगरातील गेरड लोक विढीनात दरवडेखोर म्हणून प्रख्यात आहेत अशा येरड लोकांपैकी कांहीं कुटुंबें हातांशीं धरून त्यांच्या हातात (मागाचा) धोटा देणें, आणि विणकामासारख्या अहिंसक परिश्रमाचें कौशल्य त्यांच्यामध्यें उत्पन्न करणें, आणि निढळाच्या घामानें पोट भरण्याचा आनंद चाखावयास शिकवणें ही कांहीं सामान्य करामत नव्हे

देशांत हिंदुमुसलमानांचें वैमनस्य कितीहि वाढो, आणि मतभेदाचे फाटे फुटून, त्यांतून वैयक्तिक स्वार्थ स्वराज्यानें जहाज बुडविण्यास कितीहि तयार होवो, खेडगांवांतील गरीब जनतेमध्यें राहून त्यांना ग्रामोद्योगांत आणि अहिंसक जीवन-क्रमांत तरबेज करणारे निष्ठावान सेवक जोंपर्यंत देशामध्यें काम करतांना दिसतात, तोंपर्यंत निराश होण्याचें कारण नाहीं.

कर्नाटकाच्या अेका कोपऱ्यांत लहानशा पण भक्कम पायावर चाललेल्या या 'समग्र ग्रामसेवे'च्या कार्याकडे राष्ट्रहितचिंतकाचें लक्ष गेलेंच पाहिजे अशीं कामें यथाकाळीं स्वावलंबी होतात प्रारंभीं त्यांच्या मुकेप्रमाणें मदत पोचविणें हें राष्ट्राचें कर्तव्य आहे आणि समाधानाची गोष्ट ही कीं, असल्या कामांत थोडीही मदत केली तरी ती फोफावून अुगवते मला वाटतें कीं पुंडलीकजीविषयींची अेवढी माहिती वाचकांना या पत्रांचा संदर्भ समजण्यास पुरेशी आहे

माझेविषयीं अेवढेंच सांगावयाचें कीं, हिमालयातून परतल्यानंतर मी कांहीं काळ बडोद्याला राहिलों होतों त्या वेळीं श्री पुंडलीकजी मजकडे प्रथम आले होते त्यानंतर मी गांधीजी या सत्याग्रह आश्रमांत जाऊन राहिलों तेथेंही पुंडलीकजी आले होते श्री. जमनालालजींनीं जेव्हां अस्पृश्यता निवारणाचें काम काँग्रेसच्या वतीनें आपल्या हातीं घेतलें, तेव्हां स्वामी आनंद आणि पुंडलीकजी या दोघांना त्यांनीं आपल्या मदतीस घेतलें होतें हरिजनांसाठी मंदिरें अुघडविण्याचा कार्यक्रम या लोकांनीं धडाडीनें चालविला होता आश्रमांत असतांना राष्ट्रीय शिक्षणाचें काम सभाळून गुजराथमधील अनेक सार्वजनिक चळवळींत मी भाग घेत असें त्यांतच गुजरात विद्यापीठाची स्थापना व संचालन येअून जातात मध्यंतरीं कांहीं दिवस क्षयरोगानें आजारी पडून मी चिंचवड, सिंहगड, पवन, या बाजूला जाऊन राहिलों होतों नग शास्त्रानंतर गुजरात विद्यापीठ

जानें ? कोणी चिडले तर माझ्यावर चिडणार ! ) तेव्हा त्या बाबतीत म
त्यांचें सरें आणि अर्धे माझें सरें, अशी तडजोड करावी लागली.

यांतून अेक प्रश्न निघाला. पत्रावर मालकी कोणाची ? कोणीसें
कीं पत्रांवरील कायदेशीर मालकी लेखकाची नसून पावकाची असते.
पत्रें पाठलात तो पावक ) पण तीं छापायास देण्या न देण्याचा
लेखकाचा असतो. हा अधिकार अर्थातच लेखकाला जिवंतपणींच वापर
म्हणून लेखकाला पावकाशीं तडजोड करावी लागली. अर्थ त्यजति
आणि पुंडलीकजींही नाखिलाजानें का होईनात, लेखकाच्या आणि मक
आमहाला वश होण्यास तयार झाले, आणि त्यांनीं थोडीकार काटछाट हो

खाजगी पत्रें आणि तींही बारा पंधरा वर्षांवर किंवा त्याहूनही
कालावर पसरलेलीं अेकत्र छापतांना निदान कालक्रम 'तरी संभाळला
दुर्बोध ठिकाणीं तळटीप दिली पाहिजे; तसेंच महत्त्वाचे प्रसंग असत
थोडेसे विस्तारानें समजविले पाहिजेत; अुल्लेखलेल्या व्यक्तींची अुपयोगी
माहितीही दिली पाहिजे; खरोखर संपादन करावयाचें म्हणजे हें सर्व केलें
पुंडलीकजींनीं माझीं पत्रें जशीं सांभाळून ठेविलीं तशींच मला लिहिलेलीं
पत्रें नकलून ठेविलीं असतीं तर त्यांतीलही आवश्यक अुतारे देणें जरूरी
पण त्यांचीं पत्रें त्यांच्याकडे किंवा आज माझ्याकडे मिळणें शक्य नव्हतें.
कालक्रम जुळवून देण्याचा आणि मुद्रें तपासून देण्याचा भार त्यांनीं स्वतः
मूळ लिखाण माझें असेल तेथें मुद्रें होतां होईल तों स्वतःच तपासावीं अ
आग्रह असतो. पण माझ्या भ्रमंतीमुळें तसें करणें सोपें नव्हतें आणि म
स्वतःचा छापखाना नसल्यामुळें परस्वाधीन. अशा स्थितींत ' तुम्ही का
नका, आम्ही पाहून घेअूं.' असें आश्वासन देअून पुंडलीकजींनीं आणि म
मला मोकळें केलें. आणि आतां पुस्तक हातीं आल्यानंतर पाहातों त
आश्वासन मुमुर्षुजनांना अंतघडीला दिलेल्या आश्वासनाअितकेंच पाळलें .
अेक समंध पत्र निरनिराळ्या ठिकाणीं दोन वेळां छापलें गेलें आहे. कर्नाड
रावांना कर्नल सदाशिवराव बनविलें आहे. अेवढीं दोनच उदाहरणें दिलीं
आहेत. श्री. पुंडलीकजी पुष्कळ कामें अंगावर घेतात, अंग मोडून आ
तोडून तीं पार पाडतात; पण त्यांच्या ' चालेल की ' मुळें त्यांच्या श्रमाच

निष्ठेच्या मानानें फळ त्यांच्या पदरीं पडावें तितकें पडलं नाहीं. हा दोष वाटतो तितका लहान नाहीं. तो दोष घालविलाच पाहिजे.

श्री. पुंडलीकजी हे मूळचे मिरजेचे रहाणारे. तेथील युवराजाच्या संगतींत शाळेंत शिकलेले पुढें त्यांना देशभक्ति सुचली बंड करून क्रांति करावी, राज्यकर्त्यांविरुद्ध कट करून कित्येकांचे खून करावेत, अशा दहशतवादी विचारांनीं त्यांच्या बालमानसांत ठाणें दिलें. पुढें राष्ट्रीय विचारांचीं प्रवचनें देणाऱ्या कीर्तनकारांच्या शिफारशीनें ते कर्नाटकचे पुढारी श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्याकडे राहिले तेथें दृढ अर्थानें शिक्षण होत नाहीं म्हणून असंतुष्ट होऊन ते काशी-बनारसपर्यंत जाऊन आले, पण कोठेंच जम बसेना. म्हणून बेळगावला गंगाधररावांच्याकडे परत गेले. गंगाधररावांनीं गांधीमार्ग स्वीकारला आणि रचनात्मक कार्यक्रमासाठीं स्वतःच्या गांवीं 'आश्रम' काढला. नेव्हां खादी वगैरे केवळ रचनात्मक कार्यांत रहाणें पटेना म्हणून श्री. पुंडलीकजींनीं पुनः गंगाधररावांना सोडलें आणि गीता व उपनिषदें यांवर प्रवचनें देत ते महाराष्ट्र व कऱ्हाडमध्यें हिंडले. पुढें बिहारमध्यें चंपारण्य जिल्ह्यांत गांधीजींच्या आज्ञेनुसार अेक वर्षपर्यंत त्यांनी निर्भयपणें खेडुतांची सेवा केली. श्री पुंडलीकजींचा गांधीजींशीं प्रथम संबंध आला तो चंपारण्यामध्यें. त्यानंतर गांधीजींच्या सत्याग्रहाश्रमांत आणि गांधीजींच्या दौऱ्यांत केव्हां केव्हां श्री पुंडलीकजी येऊन रहात असत. त्यानंतर कांहीं महिने साबरमती येथें गांधीजींच्या आश्रमांत खादीविद्या आणि शौचकूप साफ करण्याची कला त्यांना शिकून घ्यावी लागली. गांधीजींना साक्षी ठेवून देशसेवेसाठीं त्यांनीं सत्य व स्वराज्य मिळेपर्यंत ब्रह्मचर्य हीं व्रतें घेतलीं.

गंगाधररावांची व्यक्तिगत सेवा करावी, सभा-परिषदा भरविण्यांत हातभार लावावा, तशीच संधी साधल्यास सभेंत भाषणेंही करावीत, आणि अशा रीतीनें हळूहळू 'पुढारी होण्याच्या' मार्गास लागावें, अशी त्यांची त्या वेळीं प्राथमिक महत्त्वाकांक्षा होती पण थोरथोर लोकांचा सहवास लाभल्यामुळें, गंगाधररावांच्याबरोबर सबंध हिंदुस्थानचा प्रवास झाल्यामुळें, आणि गंगाधररावांच्या कृपेनें अनेक लहानथोर चळवळींमध्यें व सार्वजनिक कार्यांमध्यें, गोविंदराव याळगीसारख्या अव्वल दर्जाच्या देशभक्तांच्या हाताखालीं कांहीं वर्षे व पुढें स्वतंत्रपणें जबाबदारीनें काम करण्यास मिळाल्यामुळें, पुंडलीकजींचा जीवनाचा व महत्त्वा-

२

प्रिय पुंडलीक,

तुमचें पत्र पोहोंचलें. सहज साधणारी खोटी साक्ष देण्याचें टाळल्यामुळें केस हरून तुमचें शेत गेलें, याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों व खालील वाक्य भेट म्हणून पाठवितों :

The less I have, the more I am.

कोशाविषयीं हरिभाऊना पुन्हा लिहीन. वाटल्यास तुम्ही त्याना लिहा· तुम्ही आपल्या खर्चानें अजमेरला राहिलात तर तुमची मदत ते आनंदानें स्वीकारतील.

काका

पू. श्री. गंगाधररावाना माझा सादर प्रणाम कळवावा. इतरांस सप्रेम वंदे मातरम्.

  

३

गुजरात विद्यापीठ
अहमदाबाद
ज्येष्ठ शु. १, सोम.

प्रिय पुंडलीकजी,

सोबतचें पत्र तुमच्या हिंदी कोशासंबंधानें आहे मला वाटतें, तुम्ही कोशाच्या बाबतींत आतां निष्काम व्हावें हेंच चांगलें मी जर त्या लोकाना आग्रह केला तर माझ्या भिडेस्तव तुम्हाला बोलावून घेतील. पण भीड, वजन किंवा शब्द विकून खाणें, हें केव्हाहि बरें नव्हे अितकें असून जर तुम्हाला रहावत नसेल तर तुम्ही अजमेरला जाअून रहा. पण त्याचेकडून

कसलेच पैसे घेअू नका. तुमच्या जेवणाचा खर्च गगाधररावाकडून घेअू. आज ते लोक कोश छापतात, तें देखील माझ्या आग्रहामुळेंच दोन हजार रुपये पाण्यात गेले असें समजूनच ते काम करणार. तुम्ही त्याना आता कोणतीहि भीड न घालाल आणि कोश विकण्यात मदत कराल तर अुत्तम होअील. *

पू श्री. गगाधररावाच्या सेवेंतच हिंदीसेवा येअून जाते.

काका

---

# ४

आश्रम, साबरमती
फाल्गुन शु २, शनि.

प्रिय पुडलीकजी,

आप तो अबी हिंदी लोक बन गये तेव्हा तुम्ही मला काकाजी लिहिले पाहिजे, नाहीं का ? व मी तुम्हाला पुडलीकजी लिहिलें पाहिजे ! तुमच्या पत्राच्या शेवटीं क्षमापन असतें, तें मला कसेंसेंच वाटलें माझे केस पांढरे झाले हें खरें, पण त्याबरोबर तुम्हाला देखील मिशी फुटली आहे. तेव्हा पूर्वीचा सबध कायम ठेवणें कठीण न व्हावें

कोशाविषयीं हरिभाअूना आज पुन्हा लिहिलें आहे त्याचें अुत्तर ते तुम्हाला परभारें पाठवितीलच. कोशाच्या बाबतींत तुम्ही मला वार-वार लिहिलें तरी मला त्याचा त्रास किंवा कटाळा नाहीं सुअीणपणाची म्हणून कांहीं हौस असते कीं नाहीं ? कोर्टाच्या आणि प्रेसच्या बाबतींत खस्ता खाव्या लागणारच तुम्ही कोर्टाला कटाळून घरचें शेत सोडून दिलेंत, तसा कोश सोडून देणार काय ? (हा सर्व विनोद आहे अेवढें समजाल ना ? हिंदीप्रचार आणि तालीम यांचें अुदाहरण देखील विनोदा-दाखलच दिलें होतें )

आता प्रूफ-संशोधनाविषयीं हरिभाअू स्वत खादीकामात पडले आहेत सध्या ते मोठे माणूस होअू घातले आहेत मित्राच्या सहाय्यानें प्रकाशनाचें काम चालवितात त्याना मीं लिहिलें आहे कीं, दोन्ही भाषेत निष्णात असा कोणी प्रूफ-संशोधक मिळाला असेल तर तसें कळवा, नाहींतर प्रुफें पुंडलीककडे पाठवा पित्याला आपल्या अपत्याविषयीं काळजी आणि अभिमान वाटणें योग्य आहे पण मी तुम्हाला विचारतों कीं, *तुम्ही प्रुफें केव्हा व कशीं सुधारणार?* गगाधररावांनाराेअरच्या प्रवासात प्रुफें तुमच्या मागें कोठवर धावतील? मला तर वाटतें कीं, संशोधन काशीला तुमचेपेक्षा *अधिक* चागलें होअील तुमचे श्रम कमी नाहींत, पण जी संस्था कोश छापून त्यांत दोन तीन हजार रुपये गुतवून ठेवील, तिला देखील काम फडपोशी न व्हावें अितकी आस्था असणारच संस्थेला पैसे आणि अब्रू हीं दोन्ही सभाळावयाचीं असतात तेव्हा थोडासा विश्वास ठेवावा

गरीब माणसाच्या मन:स्थितीविषयीं तुम्ही जें लिहिल आहे, तें अक्षरश खरें आहे मीहि अेक सभावित अकिंचनच आहें निराश होण्याचे प्रसग टाळण्याअितकी दूरदर्शिता मीं जर ठेवली नाहीं, तर माझेहि यथेच्छ हाल व्हावयाचे तुमच्या माझ्यात मुख्य फरक हा आहे कीं, मी माझ्या आर्थिक पगुपणावर मुळींच चिडत नाहीं गरिबी हा पगुपणा आहे असें मला ज्या दिवशीं वाटेल, त्या दिवशीं मी नास्तिक झालों असें समजा त्रास होतो तो गरिबीमुळें होत नसून सात्त्विक का होअीनात पण अिच्छाच्या आणि वासनाच्या बाबतींत आत्म-सयम नसल्यामुळें होतो जो स्वताची अपेक्षा शून्य करतो आणि सेवा शक्य तितकी अधिक करतो, त्याची तुष्टि, प्रतिष्ठा आणि अध्यात्मिक शक्ति हीं अनतपटीनें वाढतात गणितशास्त्रात व्यवहारी अपूर्णाकाचा हाच नियम आहे सेवा हा अश आहे आणि अपेक्षा हा छेद आहे छेद जितका लहान तितकी अपूर्णांकाची किंमत अधिक छेद अेक करा, म्हणजे *अपूर्णांकाचा पूर्णाक होतो* याहून कमी करीत गेलें म्हणजे सख्या दुप्पट, तिप्पट, चौपट होते छेद शून्य केला तर सख्या अनत होते

*निराशेनें किंवा वैतागानें का होअीना तुम्ही जें तत्त्वज्ञान शोधून काढलें* आहे तेंच प्रसन्नतेनें स्वीकारलें म्हणजे सर्व काम झालें

कोशाची प्रस्तावना प्रथम तुम्ही लिहून काढा. त्यांत मीं माझें डोकें चालवून ती अगदीं माझीशी करून टाकीन.

पूज्य श्री. गंगाधररावांच्या प्रकृतीविषयीं शक्य ती काळजी घेत आहांच. तुम्हाला दोन्हीकडून संभाळावें लागतें, हें मला ठाऊक आहे. तुम्हाला जोर यावा म्हणून मी जरा आग्रहानें लिहिलें होतें. मी गंगाधररावांना अेक पत्र लिहिणार आहें. कदाचित् बापूजींकडून लिहवीन.

कवि म्हणजे रसज्ञ. त्याला स्वतःची नीरस कविता निर्दयतेनें छाटून टाकतां न येअील तर त्याच्या रसज्ञतेला बट्टा लागेल. वाअीट कवितांचें ग्रहण चांगल्या कवितांस लागून, सर्व संग्रह बिघडतो. सर्वत्र काळोख पसरतो. हें मीं कोणासाठीं लिहिलें असेल बरें ?

काका

५

ॐ

चिंचवड,
३-८-२६, मंगळवार

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें पत्र कां नाहीं ? छातींत दुखूं लागल्यापासून मीं स्वहस्तें पत्रें लिहिण्याचें सोडूनच दिलें आहे, असें म्हणतां येअील. पू. श्री. बापूजींना देखील चि. छोटालालकडून लिहवितों. तुमचा सध्यांचा कार्यक्रम कळवाल ! अंत्यजसेवेसाठीं काय करीत असतां ? दरेक ब्राह्मणानें होअील ती अंत्यज-सेवा केलीच पाहिजे, तरच हिंदुसंघटन खरें खुरें होअील. अगदीं गलिच्छ अंत्यज अर्भकाचा प्रेमानें मुका घ्याल, तेव्हांच खरे ब्राह्मण ठराल. निर्विकारी प्रेम हें शौचधर्मापेक्षां केव्हांहि श्रेष्ठ आहे. प्रत्येक मातेला हें धर्मरहस्य ठाऊक असतें. खादीचें काम तुम्ही वाटल्यास न करा, पण अंत्यजसेवा जरूर कराच करा.

काका

६

आश्रम, साबरमती,
आषाढ कृ. ४, रवि.

प्रिय पुंडलीकजी,

तुमच्या किंवा कोणाच्याहि स्नेहास मी लायक आहें, असें मी कधींच मानलें नव्हतें. पण तुम्ही मजवर प्रेम करतां त्याला माझा नाअिलाज आहे. आज हिंदी कोशासंबंधीं अेक देखील विचार किंवा सूचना माझ्या डोक्यांत येत नाहीं. आज मी अंत्यजमय झालों आहें. हिंदु-मुसलमान हा जर आजचा प्रश्न असेल तर पांढरपेशे ( सवर्ण ) अंत्यज हा अुद्यांचा प्रश्न आहे. हें स्पष्ट दिसत असतां स्वस्थ कसें बसावें ?

स्नेहाधीन,
काका

७

सिंहगड,
२०-३-२६

प्रिय पुंडलीक,

तुमचें पत्र पोहोंचलें. कोशाची काळजी करूं नका. तें पास झाल्या-सारखेंच आहे. स्वामी येथून अहमदाबादला गेल्यावर सर्व व्यवस्था करतील. तुमचेकडून लिहून वगैरे घेण्याचें कांहींच नाहीं. तुमची येथें येअून राहण्याची ऑफर औपचारिक होती, असें कधींच वाटलें नव्हतें.

काका

८

ॐ

यवत,
शुक्र.

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें पत्र पोहोंचलें. पू. श्री. गंगाधररावाना अजून ताप कां येतो हें समजत नाहीं. तुमचेवर अेक ठपक्याचा ठराव आणला पाहिजे.

तेथें अंत्यजशाळेंत तुम्ही काम करतां .किंवा नाहीं ? रोज अेक तास शाळेच्या सुरवातीला जाअून मुलांचे दांत, कपडे, वगैरे स्वच्छ आहेत किंवा नाहींत हें तपासत जा व स्वतः अेक दोन बादल्या पाणी वंगाळांत घालून मुलांचीं नाकें धुअून काढा. नारायण प्रसन्न होअील. माझी प्रकृति आहे तशीच आहे. छातींत दुखत असतें. अन्नपचन आतां सुधां अशी आशा वाटते.

आतां हात थकला, यामुळें बंद करतों.

काका

९

ॐ

आश्रम
साबरमती,
आश्विन कृ. १३, बुध.

प्रिय पुंडलीकजी,

गीता कहती है कि कर्म में अकर्म देखो, और अकर्म में कर्म। वैसे ही जेल में आजादी थी, और आजकल के जीवन में अुसका अभाव है। हुदली में आप स्वतन्त्र रहते हैं और घूमने में परतन्त्र होते है, इसका अनुभव है ही.।

काकाचे
सप्रेम वंदेमातरम्

# १०

ॐ

चिंचवड,

शुक्र.

प्रिय पुंडलीकजी,

पूज्य श्री. गंगाधररावांचें अेक पत्र आलें आहे. त्यांत तुमचेविषयीं खालील आशयाचा मजकूर आहे.

“ पुंडलीक तिकडे आले असतीलच. बेळगांवला हिंदीचा वर्ग सुरु झाला आहे. १५–२० लोक येतात असें समजतें. तूर्त श्री बाबासाहेब काम करीत असतात. हिंदीची खरी सेवा करण्याचें त्यांचे मनात असेल तर तूर्त पुस्तकें लिहिण्याचा मोह आवरून या सर्वांचा फायदा घेऊन कांहीं काम करून दाखवावें, असें मला वाटतें. त्याना विचारून काय तें कळवावें मला थोडें बरें वाटूं लागल्यानतर मी बाहेर पडणार आहें पुंडलीकजी बरोबर असतील तर बरें तथापि त्याच्यावर जुलूम करण्याची अिच्छा नाहीं ” वगैरे.

माझें स्वतःचें मत असें आहे कीं, तुम्ही अेकदम श्री गंगाधररावांचेकडे जावें तालमीचा मोह व तदर्थ पैशाचा लोभ हे तुमच्या अुत्कर्षास पोषक नाहींत पुस्तकासाठीं जिकडे तिकडे भींड खर्चून वशिल्याचें असलेलें भांडवल विकून खाणें ठीक दिसत नाहीं. माझी सूचना आहे कीं, पुस्तक कोणाला तरी देअुन टाका याअुपर तुमची मर्जी

काका

केसरी चावचवला आहे. म्हणे, “ टिळक पक्षाला विरोध करण्यासाठीं सत्याग्रहाश्रम स्थापन झाला ! ” असो ! नीट समजत नाहीं, याला त्यांनीं तरी काय करावें ? मला त्यांचा राग येत नाहीं, दया वाटते.

११

ॐ गुजरात महाविद्यालय,
अहमदाबाद
शनिवारची मध्यरात्र

प्रिय पुंडलीक,

स्वच्छ खोली निष्कारण झाडल्याबद्दलचा तुमचा ठपका पोहोंचला—गोड वाटला.

शिराळकरांचा वाडा देऊन टाकून तुम्ही स्वतःचा आत्मा मिळविला, व जनांतहि सज्जनतेवरचा विश्वास वाढविलात. देव तुमचें कल्याण करो! 'बिनधोक अुडी ठोकण्याची कला' तुम्हाला अखंड लाभो.

लहान बंधूंच्या लग्नाची काळजी वडील बंधूंनीं करावी, हें योग्य खरें. पण ब्रह्मचाऱ्यानें लग्नें लावावींत किंवा नाहीं, हाहि एक विचारणीय प्रश्न आहे. 'तुम्ही सांगाल तर मुलगी देअूं' असें म्हणून त्या लोकांनीं तुमचेवर जन्माचें ओझें घातलें आहे, हें लक्षांत आलें आहे ना? घर व शेत लहान भावाला आंदण दिलेंत, हेंहि चांगलें केलेंत. 'तिसऱ्या' गोष्टिसंबंधानें कांहींच वाटून घ्यावयाचें नाहीं असें मीं मनानें ठरविलें आहे. कर्जांतून मुक्त होणें आवश्यक आहेच.

गीतेच्या श्लोकांसंबंधीं टांचणें कराच. तुमच्याच उपयोगी पडतील. माझें विवरण मीं यथावकाश पाठवीनच. आज चंद्रशंकर येथें नाहीं. एक 'राष्ट्रीय शाळा' तपासण्यास त्याला पाठविलें आहे.

टागोरांची साधना तुम्हीं वाचली आहे काय? नसल्यास वाचून समजून घ्या. गंगाधररावांची प्रत मीं त्यांचेकडून कधींच लाटली आहे.

हिंदी संपादक न झालांत हें चांगलें केलेंत. वांचलात. 'आयुष्याच्या अिमारतीच्या पायांत' सुरुंग पडला असता.

श्री. तिमाप्पा नाअीक अत्यंत स्वच्छ व पवित्र माणूस आहेत. अंतर्मुख आहेत. त्यांनीं जर कधीं चुका केल्या तर त्या त्यांना किंवा आश्रमाला

णार नाहींत. तुम्ही त्यांचेशीं खाजगी रीतीनें मनमोकळेपणानें ांना सल्ला द्यावी.

५... ना भेटण्यासाठीं मीं गंगाधररावांना बोलावलें आहे. बापूजी मेच्या मध्यांत युरोपला जाण्याचा संभव आहे. माझी प्रकृति आतां कशी निमूट-पणें चालत आहे ! अशींच पांच वर्षें चालू ठेवणार. आजकाल क्रितीतरी काम करीत असतों. तुमचें पत्र येऊं द्या व लांबहि असूं द्या. बरें वाटतें.

काका

१२

ॐ गुजरात महाविद्यालय,
अहमदाबाद
१४-४-२८, शनिवार

प्रिय पुंडलीक,

पू. श्री. गंगाधररावांच्या पत्रावरून समजतें कीं तुम्ही मिरजेला गेलां आहांत. हें वाचून मला फारच आश्चर्य वाटलें. तुम्ही सकारण गेलां असाल. गंगाधररावांनीं परवानगीहि दिली असेल. पण मला जें वाईट वाटलें, तें तुम्हाला कळवल्याशिवाय कसा राहूं ? तुम्ही गंगाधररावांच्या म्हातारपणीं त्यांची सेवा करण्यास त्यांचेकडे गेलांत. पण तुमची भ्रमंती संपत नाहीं. सगळेच अुपद्व्याप संभाळून अुरलेला वेळ त्यांचेकडे द्यावयाचा, असें तर ठरलें नाहीं ना ? घरीं सर्व मंडळी आजारी, मदतीला कोणीच नाहीं, चालविलेलीं कामें बरोबर चाललीं पाहिजेत, अशा वेळीं तुम्हाला त्यांच्या मदतीस राहण्याअैवजीं मिरज सुचते, हें खरोखरीच आश्चर्य होय ! गंगाधर-राव रागावत असतील, चिडत असतील, तुम्हाला विषाद वाटत असेल, पण तुम्हाला हें सर्व सहन करतां आलेंच पाहिजे. खरोखर तुमच्या कसोटीची ही वेळ आहे. तालमीच्या मार्गे वेडे होअून स्वधर्मभ्रष्ट होअूं नका. गंगाधर-रावांचा जीवमान असेतोंपर्यंत तालिमीकडे ढुंकूनहि पाहावयाचें नाहीं, असा

निश्चय करा. आणि तें शक्य नसेल तर मिरज सोडून कोठेंहि जावयाचें नाहीं, तालिमीचीच सेवा करावयाची, असें ठरवा. आजची स्थिति व्यभिचारासारखी आहे.

माझ्या या संतापाला मुळांत खरोखर जागा नसेल, मीं जर भलतीच समजूत करून घेतली असेल, तर मला तावडतोब तसें कळवा. म्हणजे मन स्वस्थ होईल. मात्र तार करून बारा आणे खर्चू नका. माझी प्रकृति उत्तम आहे.

काका

## १३

ॐ

मदुरा,
आश्विन शु. ५, सोम.

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें मलकापूरहून लिहिलेलें २१ ता. चें पत्र पोहोंचलें. त्यापूर्वी मी रामेश्वर–धनुष्कोटीपर्यंत जाऊन आलों. माझें भौगोलिक अंतर वाढत आहे. पण प्रेमाची सांखळी, अंतर वाढेल त्याप्रमाणें, नवेनवे दुवे वाढवीतच जाते. प्रेमाचें शेपूट मारुतीच्या शेपटापेक्षां देखील अधिक लंबायमान होऊं शकतें. मात्र तें जाळपोळ न करतां सर्वत्र ओलावाच आणतें.

दुःखाचें औषध विस्मरण हें खरें, पण तें औषध अपरिहार्य दुःखासाठीं आहे. झालेल्या चुका दुरुस्त करून जें दुःख दूर करणें शक्य आहे, त्याचें विस्मरण करून कसें चालेल ? अशा प्रसंगीं दुःख हें आपल्याला जागृत ठेवणारा मित्र आहे. त्याचें विस्मरण म्हणजे मरण होय. ही दुःखाची मीमांसा झाली. पण तुम्हाला दुःखी व्हावयाला मी सांगत नाहीं.

पृथ्वीला केंद्रस्थान मानून रचलेलें ज्योतिष नेहमीं चुकीचें आणि गणित त्रासदायक असतें. सूर्याला ग्रहपति ओळखून ज्योतिष रचलें, म्हणजे पृथ्वीला

आपलें नम्र स्थान घ्यावें लागतें हें खरें पण मगच खगोलाची रासक्रीडा बरोबर समजते पृथ्वी सेवक, सूर्य आराध्यदैवत अथवा पृथ्वी अहंकार, सूर्य कर्तव्य वाटेल त्या रीतीनें रूपक बसवून घ्या

पू गगाधररावांच्या चुकांची कल्पना कांहीं अशी मला आहे तुमच्या निदेशीं मी अेकजीव आहें गगाधररावांचा आणि तुमचा स्वभावहि मला कांहीं अशीं समजतो मला स्पष्टनें म्हणावें लागतें कीं, आजच्या परिस्थितींत तुमचा दोष कमी नाहीं पण हें सर्व अपरिहार्य आहे तर्कनें चालणिारे जुने शास्त्री बदललेल्या परिस्थितींत वकील झाले, तरी त्याचें कार्य अेकच असणार आणि ज्यांचे पूर्वसंस्कार हरिदास–पुराणिकांचेच आहेत, त्यांना आजच्या परिस्थितींत मासिकें आणि व्याख्यानेंच सुचणार !

वीरहि बोलतो आणि भाट चारणहि बोलतो वीराची वाणी बलप्रेरित, ओजस्वी, चारणाची वाणी कौतुकप्रेरित आणि लालित्यमय असते अेक साहित्याचा प्रभु, दुसरा साहित्यसेवी शिवाजीमहाराजांनी मराठी भाषेला तीन चारच अमर वाक्यें अर्पण केलीं लोकमान्य आणि गांधी यांनीं साहित्यापासून पुष्कळ सेवा घेतली आणि साहित्य कृतार्थ झालें, अुन्नत झालें

आतापर्यंतच्या अनुभवावरून पहा समाजसेवेंतच तुमची आत्मिक आणि सामाजिक अुन्नति झाली आहे साहित्यसेवेनें तुम्हाला कितीहि सुख आणि संतोष दिला असला, तरी तुम्हाला आतून प्रत्येक वेळा पोकळच वाटलें आहे हें वाटणें हळुहळु जोरकस होअील व मग तीव्र प्रगति वाटेल तसें होण्यापूर्वीच विचार करा

*हें सर्व सहज लिहिलें आहे पण मला वाटतें, आता तुम्हाला बलवान्* संस्कारांचा पूर्ण अनुभव घेतल्यावाचून शांति नाहीं तेव्हा साहित्यसेवेचा अवतार परिपूर्ण विकसू या अवतारकार्य सपल्यावर निजधामाला यात्रेयाचें आहे, हें मात्र विसरू नका पू गगाधरराव व मी तुमची वाट पहात असू

तुमच्या पत्रात 'चिरप्रवासी' शब्द वाचून वाअीट वाटलें " ""प्पूजी सतत प्रवास करतात माझ्याहि दैवीं प्रवास आहे पण ' चिरप्र
श्लोकात आला आहे, त्या श्लोकाची आठवण होअून वाअ

आदर्श-पाहतां आणि गंगाधररावांचें आजचें कार्य पाहतां अेकादा मुलगा ते सतत बरोबर बाळगतील असें वाटत नाहीं. बेंगळूरला अनंतराम म्हणून एक अबोला पण भक्तिमान आणि चुणचुणीत मुलगा त्यांना चिकटला आहे. त्याचा भाअू राजगोपालचारी यांच्या आश्रमांत असतो. अनंतरामाला मी पढवून ठेवलें आहे. त्या वेळीं जणूं काय माझ्या तोंडीं तुम्हीच बोलत होतां.

पत्र येथेंच पुरें करतों. पू. बापूजींची प्रकृति बरी आहे. माझी कणखर होअू लागली आहे.

मला वरचेवर लिहित चला. आमचा पत्ता वर्तमानपत्रांतून न मिळाला तर कायमचा या पत्राच्यावर छापला आहे.

काकाचा सप्रेम
'वंदे मातरम्'

## १४

ॐ

कोओीमतूर,
२०-१०-२७ गुरु.

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें मंगळूरपीरहून लिहिलेलें कार्ड मिळालें.

"कमी" "अधिक" चा वाद अुगाच कशाला? प्रेमाच्या हातांत तराजू नसतो. आंधळी न्यायदेवताच अेका हातांत तरवार व दुसऱ्या हातांत तराजू धरते.

अनंतरामाची 'योजना' झाली नाहीं. तुमचें स्थान नेहमीं, तुम्ही परत जाओीतोंपर्यंत, खालींच राहणार, हें पू. गंगाधररावांच्या हल्लींच्या पत्रावरूनच अनुमान करून सांगतों. तुम्ही तर्कबुद्धीला मारलें पाहिजे, श्रद्धेनें आंधळें झालें पाहिजे, म्हणजेच तुमची दृष्टि स्वच्छ होओील व तुमचा मार्ग तुम्हांला आपोआप दिसेल. अनंतरामाशीं मीच गुन्हा केला आहे कीं, माझ्या वर्तनें त्यानें गंगाधररावांच्या प्रकृतीकडे लक्ष द्यावें.

. हरिभाअूशीं व जमनालालशीं मी भांडलों, त्यामुळें शेवटीं कोश छापण्याचें त्यांनीं ठरविलें आहे. तुम्ही वाटल्यास हरिभाअू अुपाध्याय, 'त्यागभूमि', अजमेर, या पत्त्यावर लिहा. कोश छापण्याचेंच त्या लोकांनीं नाकारल्यामुळें मला त्यांचेशीं खूप भांडावें लागलें होतें.

शुक्र. २१

कारंजाहून लिहिलेलें तुमचें पत्र पोहोंचलें. गंगाधररावांचा स्वभाव तुम्ही अंतर्बाह्य जाणतां. त्यांचेशीं जुळवून घेणें हा पातिपत्नीधर्मासारखा धर्म आहे. हा धर्म कठीण आणि अणु आहे, हें मी जाणतों. पण दुसरा अुपाय नाहीं व त्यांत अपमानहि नाहीं. क्लेश अवश्य आहे, पण यथाकाळीं सुंदर अध्यात्मिक फळ मिळतेंच. मोक्षाची तयारी सेवाधर्मातून अुत्तम होते. पण मोक्ष खराखर हवा आहे किंवा नाहीं, याची कसोटीहि होते. 'क्षुरस्य धारा निशिता.'

मी तुम्हांला अहंकारी मानीत नाहीं. पण स्वतःच्या बुद्धीला धरून चालणारे मानतों व केव्हां केव्हां स्वतःच्या वृत्तीला वश होणारे मानतों. या दोषांतून मुक्त कोण आहे ? पण हा दोष आहे, अेवढें पटलें तरी पुष्कळ आहे.

तुमच्याविषयींचा अभिप्राय मी बदललेला नाहीं. तुमची विटंबना मी जाणतों. श्रद्धा, सेवा, नम्रता, हें सर्व असूनहि ज्याला 'बुद्धीचा अुद्धटपणा' असें लोक म्हणतात, तो तुमच्यांत आला आहे काय हें तपासून पहा. मला तसें कांहीं दिसत नाहीं. पण प्रेमाची दृष्टि आंधळी असते.

कुमरी आश्रमाचा रिपोर्ट मला कोठून मिळणार ? मिळाला पाहिजे, पण मी तो मुळींच मागविणार नाहीं.

मला वाटतें, चर्चा करण्यापेक्षां भेटीपर्यंत तहकूब ठेवावें, हेंच अधिक चांगलें. मी सहज अधिक तात्त्विक भाषा लिहावी व ती तुम्हाला लागावी, याहून अधिक अनिष्ट कोणतें ? अजाणतां तुमच्या मनःस्थितीमध्यें तुम्हांला जरा देखील मी दुःख दिलें तर मला वाअीट वाटेल.

आजचा कार्यक्रम असा आहेः तीन दिवस तिरुसपूर. ता. २५ ला कालिकत. पुढें मंगळूर. नोव्हेम्बरचा पहिला पंधरवडा लंका (सिलोन). तेथून उत्कल (ओरिसा प्रांत) येथें अेक महिना अेकच ठिकाणीं रहावयाचें व तेथून परत घरीं (गुजरातेंत).

हरिभाऊंना आवश्यकता वाटल्यास अजमेरला जा. कोशाचें काम तटस्थ निष्काम भावानें होऊंद्या. हौसेचा भाग मनांत देखील आणूं नका.

काका

---

## १५

ॐ

साबरमती आश्रम,
आश्विन शु. १३, बुध.

प्रिय पुंडलीकजी,

पुष्कळ दिवसांत तुमचें पत्र नाहीं. असें कां व्हावें? माझ्या मागील पत्राचा तुम्ही गैरसमज तर करून घेतला नाहीं ना? पूज्य श्री. गंगाधररावांच्या प्रकृतीविषयींची खबर तुमचेकडून मला कळावयास पाहिजे. गंगाधररावांच्या अुतारवयांत त्यांचा स्वभाव, त्यांच्या आवडीनिवडी, सर्व गोष्टी यथायोग्य समजून त्यांची सेवा करावयास तुमचेवांचून दुसरा कोण असणार? त्यांच्या स्वभावांत मूळचाच संकोच पुष्कळ. नवीन माणसांच्या हातीं त्यांचे हालच होतील. तुम्हीं त्यांचेकडे आहां, या कल्पनेनें मी नेहमीं निश्चिंत असें. हल्लीं अेकसारखी काळजी लागलेली आहे. नुकतेच त्यांनीं दांत काढून घेतले आहेत. त्यांची पचनशक्ति बिघडली असेल. रात्रीं त्यांना झोंप येत नसेल. मधून मधून तापहि येत असेल. ते कोणाजवळ बोलावयाचे नाहींत. तुम्हींच त्यांचेजवळ असलें पाहिजे. शेवटपर्यंत तुमच्याच हातून त्यांची सेवा झाली पाहिजे. राजकारणाची चर्चा त्यांच्याशीं करूं नका. पण त्यांच्यांजवळ तुम्हीच असा. वाटल्यास त्यांना सांगा कीं काकांच्या आग्रहानें मी रहात आहें. तुम्ही व रावसाहेब दोघांनीं त्यांचेजवळ असावें. कांहीं लोक टीका करतील, त्याची पर्वा करून कसें चालेल? तूर्त हिंदी, 'तरुण भारत', खादी, वगैरे सर्व बाजूस ठेवून गंगाधररावांच्या सेवेचा विचार

केला पाहिजे तुम्हाला या सर्व गोष्टी मी लिहिल्या पाहिजेत, असें नाहीं परंतु मनाला वाटत असलेली चिंताच हें सर्व लिहविते पत्र यावें

आपला
काका

---

# २६

ॐ                 साबरमती जेल
देवदिवाळी

प्रिय पुंडलीकजी,

रिकामा बसल्या कितीतरी वेळा तुमची आठवण होते जेलमध्यें मी वेताच्या खुर्च्या विणण्यास शिकलों आहें व त्याहि कशाबशा नाहीं, धंदेवाअीक लोकांनींहि हेवा करावा अशा, नगाऱ्याप्रमाणें वाजणाऱ्या त्यानंतर शिंपी बनलों पण येथें मनाजोगें कामच मिळेना करगुप्पीकराच्या पाठोपाठ प्रिय आणि आतां पूज्य गोविंदराव जातील अशी कल्पनाहि नव्हती खरोखर कर्नाटकाचा एक हिरा हरपला गोविंदरावासारखेच जर सर्व देशसेवक असते तर कधींच आअीच्या तोंडचें काजळ धुतलें गेलें असतें पण आतां त्याच्यासाठीं नित्य हळहळणें हें आपलें काम नव्हे त्याच्या निकट परिचयांतील आपण सर्वांनीं त्याच्या अनेक गुणांचें अनुकरण न केलें तर त्याच्या प्रेमास आपण लायक नव्हतों, असेंच ठरेल त्याची पवित्र स्मृति हा आपणावरील अेक मोठा भार आहे त्याच्या अनुकरणानेंच तो कमी होअील

आपण सर्वांनीं पूज्य श्री गंगाधररावाचें दुःख हलकें केलें पाहिजे व त्यांना मनुष्यबळ कमी पडूं देतां कामा नये बाबासाहेब गोविंदरावाच्या मुलाच्या शिक्षणाची शक्य ती काळजी घेत असतीलच

मजलोंच्या गैरहजेरींत गंगाधररावांना अतोनात अडचण पडत असेल. ज्या समाजांत अेकाचें पडलेलें काम पडतां पडतां अुचलणारा दुसरा कोणी अुभा होत नाहीं त्या समाजाची दुर्दशाच !

याळगींच्या बंधूंचें व घरच्या मंडळींचें कोणत्या शब्दांनीं सांत्वन करावें, हेंच समजत नाहीं. पण त्यांनीं अनेक प्रसंगीं असाधारण धैर्य दाखविलें आहे व सर्व देश त्यांच्याबरोबर दुःखी आहे, हें ते जाणतच आहेत.

पूज्य श्री. गंगाधररावांच्या प्रकृतीस खूप जपत जा. माझी प्रकृति आतां बरीच सुधारली आहे. वजन ११४ पौंड आहे. माझें नेहमींचें वजन ११९ पौंड आहे. येथें १०३ पर्यंत अुतरलें होतें. लोकमान्य येथें असतां ज्या ठिकाणीं राहात होते, त्याच ठिकाणीं मला रहावयास मिळालें आहे. हें भाग्य काय थोडकें आहे ?

तुमचा भाऊ,
काका कालेलकर

या पत्रांतील एक अक्षरहि सध्या जाहीर करूं नका. बाबासाहेब वगैरेंना दाखवा पण खाजगीच ठेवा.

ॐ

## १७

आश्रम,
साबरमती
भाद्रपद शु. ११, रवि.

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें पत्र पोहोंचलें; तुम्ही बाअीला का गेलांत याविषयींचा खुलासा अजूनहि मजजवळ कोणी केला नाहीं. प्रकरण नाजुक असावें या समजुतीनें मींहि कोणास हें विचारलें नाहीं. बाअीची संस्था मी दोन वेळां पाहिली आहे. नारायणशास्त्री मराठे याचेविषयीं मला आदर आहे. जगाच्या दृष्टीनें सध्या

यशस्वी होणार यानिषयीं शंका नाहीं श्री. देसाअी हे संस्कृत विद्येचे अभिमानी आहेत, हेंहि मला ठाअुक आहे. तरी वाअीची संस्था जुन्या विद्येची प्रतिष्ठा व अुपयुक्तता वाढविण्याचे दृष्टीनें जिंग्रजी, सायन्स व अितिहास या वस्तूना जें अधिकाधिक स्थान देअू लागली आहे त्याचा विचार करता, आय शास्त्रांची दृष्टि, आर्यांचा सामाजिक आदर्श आणि जीवनाचे प्रश्न सोडविण्याची आपल्या पूर्वजांची हातोटी–या तिन्ही वस्तूंचें तेथें शुद्ध अध्ययन होणें क्वचित् कठीण जाअील अशी मला भीति वाटते मुंबअी युनिव्हर्सिटीच्या सर्व कॉलेजमध्यें फर्ग्युसन कॉलेजचें वैशिष्ट्य हें आहे कीं, तेथें मराठ्याचा अितिहास व संस्कृत यांचें अध्ययन अुत्कृष्ट होतें पण, कसेंहि झालें तरी फर्ग्युसन कॉलेज पाश्चात्य विद्येची प्रतिष्ठा वाढविणारीच संस्था आहे तिच्या गुरुस्थानीं पाश्चात्य विद्या आहे वाअीची प्राज्ञपाठशाळा जर न्यू जिंग्लिश स्कूल सारखें हाय स्कूल किंवा फर्ग्युसन कॉलेजसारखं कॉलेज झालें तर तुम्हाला आनंद होअील कीं दुःख होअील? वाअीची प्राज्ञपाठशाळा अेका काळीं अत्यंत गरीब विद्यार्थ्यांना शिक्षण देणारी आणि मदत करणारी संस्था होती आज तशी ती राहिली आहे काय? तेथील शिक्षकांचें बालबोध आचरण आणि प्रखर विद्वत्ता पाहून मध्यम वर्गानें तिला युक्तीनें आपलीशी करून टाकली नाहीं काय? जेथें पहावें तेथें गरीबांच्या तोंडचा घास श्रीमंत लाटतात पुन्हा थोडें घसरून जर प्राज्ञपाठशाळा आपल्या ध्येयात अजून कांहीं छाटकाट करण्यास तयार होअील तर कदाचित् मध्यम वर्गाच्या हातून ही संस्था जाअून महाराष्ट्राचीं गर्भश्रीमंत सरदार घराणीं तिला आपलीशी करतील पंचगणी जवळ आहेच. निरोगी हवा, प्रखर पांडित्य धारण करणारे शिक्षक, बालबोध राहाणी, अेवढें मिळाल्यानंतर दरमहा ५० रु खर्च करून आपल्या मुलांना अशा संस्थेंत ठेवायास महाराष्ट्रांतील सामान्य सरदार तयार न झाले तर ते बावळटच म्हणावयाचे संस्थेला स्थैर्य येअील आणि संस्थेची साधनसंपत्तीहि वाढेल पण—

पूज्य श्री. गंगाधररावांचा जीवमान असेतोंपर्यंत तुम्ही त्यांच्या तैनातीस असणें व त्यांची सेवा करून अुरलेला वेळ त्यांच्या संतोषाखातर ते साग-

तील त्या कामांत खर्च करणें, हा तुमचा स्वधर्म आहे. तुम्हांला सूत काढणें किंवा विणणें साधत नाहीं, जमत नाहीं, किंवा गमत नाहीं. पण या वस्तूंचें महत्त्व तुम्हांला पटलें आहे किंवा नाहीं ? महत्त्व पटलें असेल तर तुमचे प्रमाद माफ आहेत. कुमरीला गंगाधररावांच्या प्रवृत्तीला तुम्ही बाधक होण्याचा संभव नाहीं. पण जर खादीची प्रवृत्ति तुम्हांला अर्थशून्य किंवा महत्त्वशून्य वाटत असली तर मात्र गंगाधररावांच्याकडे तुमचा कितीहि ओढा असला तरी कुमरीला तुमचें राहणें कांहींसें अडचणीचेंच होणार, असें मला वाटतें. गंगाधररावांनीं जर कुमरीचा आश्रम चालवावयाचा तर आश्रमाच्या ध्येयाशीं ज्यांचा मानसिक विरोध किंवा द्रोह आहे अथवा ज्यांच्यामध्यें आश्रम आदर्शाला बाधक असें तादात्म्य आहे, अशा नातेवाईकांचा आणि अिष्टमित्रांचा संबंध त्यांनीं कमी केला पाहिजे. असें करण्यांत सत्त्वहानि नाहीं, उलटी सत्त्वरक्षा आहे. आश्रम चालविणें म्हणजे स्वत: आश्रमांतर करण्यासारखें आहे. पूर्वाश्रमींचे बंध संभाळून चालावयाचें नाहीं. गंगाधररावांच्या मध्यें अितकी हिंमत आहे कीं नाहीं, याविषयीं मला शंका आहे. आपण आपल्याकडून त्यांना त्या दिशेनें मदत करणें, हेंच आपल्या प्रेमाचें आणि निष्ठेचें मुख्य लक्षण आहे. गंगाधररावांशीं तुम्ही तुमचें मन किती बद्ध करून घेतलें आहे याची कल्पना मला नाहीं, असें तुम्ही कां म्हणून मानतां ? मला तुम्ही समानधर्मी समजत नाहीं काय ?

मी बेळगांवास आलों आणि तुम्ही तेथें नाहीं, हें मला बरेंच चमत्कारिक वाटलें. लागलीच तुम्हांला लांबलचक पत्र लिहावें असें मनांत आलें. पण लांबलचक पत्र लिहिण्याचा संकल्पच कार्यसिद्धीचे आड आला. माझा-तुमचा संबंध गंगाधररावांच्यामुळें आला ही गोष्ट खरी असली तरी आतां तुमचा-माझा संबंध परंपरित राहिला नसून प्रत्यक्ष आहे. तुम्ही गंगाधररावांना सोडलें, किंवा गांधींचा कसून विरोधहि केला तरी तो संबंध थोडाच तुटणार आहे ?

हिंदी कोशाचें काम म्हणजे तुमचें प्रारब्ध. तें पूर्ण केल्यावांचून गत्यंतर नाहीं. घेतलेलें काम नेटानें चालवून लवकर पूर्ण कराल असें वाटतें. मात्र तें कुमरीपेक्षां बेळगांवासच करणें अधिक चांगलें. हिंदी भाषेवर विस्तृत

निबंध लिहिण्याची आवश्यकता कितपत आहे, याचा प्रथम विचार करावा कर्व्यांच्या सत्येंत प्रो दिगम्बर आहेत ते हिंदी भाषेचे उत्तम विद्वान् आहेत नाइल्यास त्याची मदत घ्यावी, अथवा त्याच्या हातूनच आपले नगरे भाजून घ्यावेत स्वत च लिहिण्याचा आग्रह असेल तर सढळपणें पैसे खर्च करून Kellog's 'Grammar of Hindi Language', Grierve's 'Grammar of Modern Hindi,' ग्रिअरसनचे हिंदीवरचे निबंध, सेन्सस रिपोर्टपैकीं हिंदीवरचीं प्रकरणें, Encyclopaedia Britannica मधील प्रकरणें. Language, Aryan Languages, Hindustani, मिश्रबंधु विनोद, हिंदी भाषाकी अुत्पत्ति (महावीर प्रसाद), वगैरे ग्रंथ मागवून वाचून प्रथम जाडे विद्वान् व्हा, आणि एक प्रदीर्घ निबंध लिहून इतर कामासाठी कायमचे नाला-यक बना

हिंदी शिक्षक बनणें हें बरच्यापेक्षा अधिक व्यवहार्य ध्येय आहे हिंदी शिक्षक होण्यास हिंदी आणि मराठी दोन्ही व्याकरणें चागलीं शिका, हिंदीच्या शुद्ध अुच्चारणाविषयीं आज जी तुमच्यात अक्षम्य बेपर्वाअी आहे ती दूर करा तुलसीदास, कबीर, सूरदास आणि बिहारी यांचें मन पूर्वक अध्ययन करा, शक्य तितकी हिंदी कविता तोंडपाठ करा आणि हिंदी वर्त-मानपत्रें आणि आधुनिक लेखक हातात येतील तसतसे वाचून काढा यथा शक्ति अुर्दूचेंहि अध्ययन करा कुराण मराठींत मिळतेंच तें अेकवार वाचून काढा गुलिस्तान, बोस्तान, उमर खय्याम, पैगंबरचें चरित्र, खलिफाचा अितिहास, '*Spirit of Islam* (Ameer Ali,) '*Preaching of* Islam' (Arnold), 'History of Persia' वगैरे ग्रंथ शक्य असल्यास वाचून काढा म्हणजे तुम्ही हिंदीचे शिक्षक अुत्तम बनाल पण तुम्ही हिंदीचे शिक्षक कोणासाठीं होणार? महाराष्ट्रासाठीं की कर्नाटकासाठीं? कोणाला हिंदी शिक्षकाची अधिक गरज आहे? तुमचें क्षेत्र आधीं ठरवा आणि मग त्याप्रमाणें तयारी करा

माझ्या मतें, तुमचें पहिलें काम मलेरियाला देहपुरींतून कायमचें हद्दपार करणें हें आहे आज फारसा अशक्तपणा वाटत नसेल, पण उतारवयात तो

तुमचें वैर साधील, व मग पंगु पश्चात्ताप करीत बसावें लागेल. पूज्य श्री. गंगाधरराव स्वतःच्या प्रकृतीसंबंधानें कधींच कांहीं लिहीत नाहींत. त्यांचा खूप राग येतो, पण अुपाय काय? अुपाय तुमच्या हातांत आहे.

गिरधारी जमनालालजींकडे असतो. काकींची तब्बेत आतां धडधाकट होण्याची आशा फार थोडी आहे. आहे त्या स्थितींत जीव धरून संतोषानें राहिली म्हणजे पुष्कळ झालें. बाळाच्या भाषेंत बरीच सुधारणा झाली आहे. ' र ' च्या ऐवजीं ' ल ' न बोलतां र, ल, अ आणि य यांचें तो अद्भुत मिश्रण करीत असतो! त्याचें अक्षर आणि लिहिण्याचा कंटाळा हीं दोन्ही वाढलीं आहेत. शंकर हळु हळु पंडित होअूं लागला आहे. त्याच्या या स्वधर्माच्या आड येणें फारसें फायदेशीर आहे असें नाहीं.

या पत्रांतील प्राज्ञपाठशाळेसंबंधाचा मजकूर अगदीं खाजगी स्वरूपाचा आहे. त्या संस्थेवर माझें प्रेम आहे. तिचा अुत्कर्ष मी चाहतों. प्रेमानेंच सर्व कांहीं लिहिलें आहे. संस्थेच्या अुत्कर्षास जरा देखील हानि पोहोचूं नये यासाठीं हा मजकूर किंवा माझा अभिप्राय वाटेल त्याला न सांगणें. महादेवशास्त्र्यांना माझे हे विचार कळविले आहेतच. बाबासाहेब किंवा गंगाधरराव यांनीं हें पत्र वाचावयास माझी हरकत नाहीं.

तुमचा स्नेहाधीन,

काका

  

## १८

ॐ

गुजरात विद्यापीठ,
अहमदाबाद
वैशाख शु. १३, बुध.

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें २१ ता. चें पत्र पोहोंचलें. आमांशावर अेक सौम्य अिलाज दहीं हा आहे. दहीं खाल्ल्यानें आमांश कमी होतो. व या अुन्हाळ्याच्या दिवसांत

दहीं बांधण्याचा संभव कमी तेथील जबाबदार लोकांची सल्ला पडली तर दह्याचा प्रयोग करून पहावा अेकदोन दिवस नुसत्या दह्यावर राहून पहा

हल्लीं येथें आश्रमात पुनर्घटना चालू आहे आश्रमाचा आदर्श, व्रतें, रहाणी, सर्व गोष्टींची झाडून अुजळणी चालू आहे श्री मगनलालभाओ गेल्यामुळें या गोष्टीला विशेष गंभीर स्वरूप आलें आहे सर्वांनाच अध्यात्मिक शिक्षण मिळत आहे

शिराळकराचा वाडा दिल्यामुळें या भलेपणास नेहमीं जागण्याची जबाबदारी तुमचेवर येअून पडली आहे व तुम्ही ती ओळखत आहात हें चागलें आहे

*' धर्म अधर्मासी मन केलें ग्वाही ।*
*मानियेलें नाहीं बहुमता '*

कारण *' लोक जैसा ओक*
*धरीता धरवेना '*

' अमुक गोष्ट पुष्कळ लोक बोलतात किंवा लिहितात, त्या अर्थीं त्यात काहीं तरी सत्यांश असलाच पाहिजे ' ही विचारसरणी अेकदा टाकली म्हणजे आपलें मन निर्मळ होतें, व स्वाभाविक आत्मशक्ति प्रगट होते

घर व शेत दिल्यानंतर लहान बधूचे बाबतींत तुमचेवर कसलेंच ओझें असू नये तुम्ही विरक्त ब्रह्मचारी, सत्यप्रतिज्ञ देशसेवक आहात, याचें अखंड स्मरण असल्यावर कोणीहि तुम्हाला फशीं पाडू शकणार नाहीं. देवाला वहावयाचें फूल आपण अितरांस हुगू देत नाहीं, तद्वत्‌च तुमचा वेळ, तुमची शक्ति, व तुमचें ध्यान स्वराज्यप्राप्त्यर्थ देशसेवेस आणि देश - सेवकाच्या सेवेस अर्पण झालेलीं आहेत आता अितर कोणी तुमचें कार्णी लागत नाहीं फावल्या वेळीं जी काहीं मदत कराल ती मेहेरबानी सेवकाला आपल्या मोठेपणाची जाणीव असू नये, पण पावित्र्याची जाणीव असलीच पाहिजे तुम्ही वाल्ह्यास बधूचें लग्न जुळवा, पण विरक्त राहून, अलिप्त राहून हाताला खोबऱ्याचें तेल लावून मगच फणस फोडावयास प्रवृत्त होतात ना ?

तुम्ही कोणाच्याहि भिडेस पडणें याचा अर्थ काय ? तुम्ही तर भीष्मासारखें दृढनिश्चयी झालें पाहिजे 'अेकदा या सर्व भानगडींतून मोकळा झालों म्हणजे' ही मायेची भाषा आहे भानगडी कधींच संपत नसतात कातण्यामध्यें ज्याप्रमाणें सुताचा अेक ततु दुसऱ्या ततूला खेचून आणतो त्याप्रमाणें भानगडींची साखळी चालूच राहणार तोडल्याशिवाय ती तुटत नसते

आपल्या पत्रव्यवहारात बाबासाहेब आणि मजली याचा अुल्लेख का नसतो ? तुम्ही बाबासाहेबाना फार जवळ जाअून तपासा ते कर्मयोगी आहेत म्हणून त्याना सुखदु:ख नाहीं असें नाहीं हल्लीं त्याचें कसें काय चाललें आहे ?

श्री तिमाप्पाची आणि तुमची गट्टी जमत आहे, हें फारच चागलें आहे तिमाप्पा म्हणजे सोन्याचा खडबडीत गोळा तुमच्या सहवासानें गुळगुळीत होअून जास्ती तेजस्वी दिसू लागेल त्याना नेहमीं अुत्तेजन द्या त्याच्या अभिप्रायास मान द्या म्हणजे ते आपोआप सौम्य होतील माझी प्रकृति अुत्तम आहे चद्रशकरचें अक्षर हाच त्याचा तुम्हाला नमस्कार

काका

## १९

ॐ

आश्रम, साबरमती

माघ कृ २, शुक्र

प्रिय पुडलीकजी,

सख्येनें स्वत:चा ससार जसा साधेल तसा स्वत:च थाटणें, यातच गृहस्थधर्म आहे तुम्ही येथें मजजवळ असता तर गोष्ट निराळी तुम्ही आपल्या सख्येस अुसने दागिने घालून नटविलें तर तें शोभणार नाहीं खादीची

सार्वनिक प्रगति पाहून तुम्हांला काय वाटतें ? पू श्री गंगाधररावांना माझा सादर प्रणाम इतर मंडळींस यथायोग्य

काकाचा सप्रेम
वंदे मातरम्

---

२०

ॐ  आश्रम साबरमती
फाल्गुन कृ १३ गुरु

प्रिय पुंडलीकजी,

मला 'काकाजी' लिहिलेलं आवडत नाहीं ती चीड व्यक्त करण्यासाठी तुम्हाला 'पुंडलीकजी' लिहूं लागलों, पण तुम्ही खप्पीगडी दोन्ही पचवून बसलात !

बापूजींची सेवा दर खेपेला तुम्हालाच मिळावी याचा हेवा का करू नये ? आश्रमात राहूनहि आम्हाला ती मिळत नाहीं ! 'वयं तत्त्वान्वेषात् मधुकरहता, त्वं खलु कृती' अथवा साध्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे, साखरेचें खाणार त्याला देव देणार माझ्या नशिबीं आजारी पडून सेवा घेण्याचेंच आलें आहे

काका

---

२१

ॐ  आश्रम
साबरमती
माघ कृ ९ शनि

प्रिय पुंडलीकजी,

कोशाचें काम बनारसला छापण्यासाठीं गेलें आहे तेथें जें होईल तें खरें बनारसची ख्याति आहे कीं, मरण्याची उमेद बाळगणारे लोक तेथें

जाअून राहतात तुम्हाला तेथें पाठवून काय करू ? अजमेरला छापखानाच नाहीं, व मुंबअी–अहमदाबाद महाग पडतात पूज्य श्री गंगाधरराव जर तुम्हाला काशीयात्रा करू देणार असले तर जरूर तेथें जा, आणि पुस्तकाचा सुबोधपणा करा नाहीतर जें होअील तें खरें. माझ्या काहीं लेखाचें भाषांतर (अेक भाग) 'जीवन-साहित्य' या नावानें हरिभाअूनीं छापलें आहे तेंहि तपासायास आम्हा कोणाला मिळाला नाहीं स्वामी बरेच चिडले मामी अनासक्त अुदासीन वृत्ति मात्र जराहि चळली नाहीं

विस्तृत प्रस्तावना लिहावी हें खरें, पण ती तुम्हीच लिहून मजकडे पाठवून या मला योग्य वाटतील ते फेरफार करून त्या खालीं माझी सही करीन लहान मुलें स्वेच्छेनें गातात, तसें माझें लिहिणें असते सामान्यपणें सर्वांस आवडतें. पण गा म्हटलें म्हणजे गाअून घेणाऱ्यास तर तें मुळींच रुचत नाहीं, असा जवळ जवळ नेहमींचा अनुभव आहे

राजगोपालाचारींना तुम्ही दिलेला जबाब त्याना संतोषकारक वाटलाच असेल, असें सांगवत नाहीं गोड आणि व्यवहारकुशल माणूस कोणालाहि फार छेडीत नाहीं

तुमचा हा जन्म पूज्य श्री गंगाधररावाशीं बांधला गेला आहे कानडी भाषेची अडचण किती दिवस राहू देणार ? राष्ट्रभाषेचा प्रचार करणाऱ्यास स्थानिक भाषा ही आलीच पाहिजे आमचे काका गुजरातींत साक्षर झाले आहेत, याचा तुम्हाला अभिमान वाटतो, काकाचे पुंडलीक कानडींत व्याख्यान देअू शकतात, असा अभिमान बाळगण्यासाठीं मी भुकेला आहें कार्लें येथें अेका पजाबी आर्यसमाजी प्रचारकाला कानडी आणि तुळु भाषेमध्यें अस्खलित बोलताना मी अैकलें आहे पण खादीकार्याला अशी कितीशी कानडी भाषा जरूर आहे ? Action is the only language which god's children easily and correctly understand आअीचा व नवीन जन्मलेल्या बालकाचा व्यवहार कोणत्या भाषेत चालतो ?

महाराष्ट्रातील खादीकामाविषयीं तुमचा अभिप्राय वाचला विचारात घेण्यासारखा वाटत दिसतो खादीकामात मुख्य वस्तु अेकनिष्ठा आहे सार्वजनिक

फडाचे पैसे आपल्या हातात मिळाले व आपल्या हातून अनायासें अनेक लोकांवर अुपकार व्हावा व पुष्कळ लोक आपल्या वळणाचे व्हावे, असें ज्याला त्याला वाटत असतें अेकनिष्ठा नसली म्हणजे पैशावरोबर मति फिरते आणि अितर कामें आडवतात तुमच्यासारख्या सत्त्वस्थ माणसालाहि हिंदी प्रचारात असाराशी तालीम सस्था जर आडवू शकते तर ससारी पामर लोकाची काय कथा? पूज्य श्री बापूजी, जमनालालजी आणि शकर-लाल बँकर, तिघेहि वैश्य, अत्यत व्यवहारकुशल आणि राष्ट्रनिष्ठ आहेत त्याना सुचतो त्याहून अधिक चागला मार्ग असण्याचा सभव जवळ जवळ नसावा

पूज्य श्री गगाधररावाच्या प्रकृतीची किल्ली मला ठाअूक आहे तुम्ही वाटेल ते अुपाय योजून त्याच्या जेवणाच्या वेळा अगदीं नियमित करून टाका लग्नाचा मुहूर्त किंवा रेल्वेचा वेळ जसा सभाळतात त्याहून आधिक कडक रीतीनें जेवणाची वेळ सभाळली तर ते पुष्कळ वर्षे वाचून आजवर केली त्याहून अधिक देशसेवा करतील प्रवासांत देखील वेळ चुकता कामा नये मी त्याच्याबरोबर असतों तर आग्रहपूर्वक त्याचा स्वयपाकी त्याचेबरोबर फिरविला असता

दुसरी गोष्ट, जागरणाची लष्करी शिस्तीनें त्याना वेळेवर निजविलें पाहिजे या दोन गोष्टींत जे कोणी शिथिल असतील ते गगाधररावाच्या आयुष्यासबधानें बेफिकीर आहेत असे म्हटलें पाहिजे, मग प्रेमाचा जिव्हाळा कितीहि असो

चि रामचद्राविषयीं काळजी वाटते या वयात कवर का दुखावी? त्याला म्हणावें, जेवल्यानतर दोन तासानें मुबलक पाणी पीत जा दर वेळेला मोठा कर्नाटकी अर्धा तांब्या पिअून गेलें तरी अुत्तम अर्थात् पाणी हलुहलु वाढवावें माझी प्रकृति चागली आहे सर्व मडळीस यथायोग्य

काका

## २२

ॐ फार, अहमदाबाद
शनिवार

प्रिय पुंडलीक,

आणखी पंधरा मिनिटांनी माझी केस चालणार सर्व मित्रमंडळी भेटायला आली आहेत मित्रप्रेम पाहून आयुष्यातील धन्य घडी अनुभवीत आहें गिरधारी सविस्तर पत्र लिहील पूज्य श्री साहेब मुद्दाम आले आहेत पूज्य श्री गंगाधरराव, बाबासाहेब, गोविंदराव, मजली, वगैरे सर्व मंडळींना सादर प्रणाम कळवावे तुमची अेकसारखी आठवण होत आहे

काका

---

## २३

ॐ आश्रम,
साबरमती
मार्गशीर्ष कृ ९, शनि

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें पत्र पोहोंचलें तें अगदीं स्वाजगीच ठेवलं आहे तुम्ही विकाराला वश व्हाल असें मला केव्हाच वाटलें नव्हतें पण प्रेमळ लोकांच्या मोहाला आणि आग्रहाला बळी पडाल ही भीति होती, म्हणूनच तार केली तुमचें उत्तर वाचून पूज्य श्री गंगाधररावांना व मला जीव खालीं पडल्यासारखें झालें, गंगाधररावांनीं तुम्हाला बरोबर येण्याम तार केली असेलच

मतभेद ही अेक पवित्र वस्तु आहे तुमचे विचार व तुमची मन.स्थिति दोन्ही मला ठाअूक आहेत त्याचें मला वाअीट वाटत नाहीं, अुलट आदर वाटतो पण तुमची निराशा मात्र अिरसाल नास्तिकालाच शोभेल ! कोणाला न दुखविणें हा सद्गुण करा, पण पतिव्रता ज्याप्रमाणें आपलें

शील संभाळून जगाची सेवा करते, त्याप्रमाणेंच आपला मऊपणा असावा. ज्याचा आत्मा मेला, तोच निरुपयोगी, ज्याच्या वांश्यास अीश्वर नाहीं तोच अेकटा, अेवढें लक्षात ठेवा

आता थोडी तात्त्विक चर्चा ब्रह्मचारी पुडलीक लग्नाच्या अभावीं अविवाहित आहे, असें मी मानीत नाहीं त्याच्यात ब्रह्मतेज आहे तो हनुमानाचा अुपासक आहे शास्त्रार्थासाठी किंवा प्रवचनासाठीं नव्हे, पण आत्मप्राप्तीसाठीं तो अुपनिषदें वाचतो कदाचित् तो मोठा वक्ता, पडित होणार नाहीं. पण स्वताच्या चारित्र्यबळानें देशोद्धारक जरूर होणार आहे त्याचें जीवन हेच अेक अखड व्याख्यान त्याची निष्काम सेवा, निर्भयता आणि ब्रह्मचर्यपालन या गोष्टी पाहून पुढार्‍यानी, वक्त्यानीं, लेखकानीं आणि मुत्सद्यानी स्वत.स साभाळावें व आश्वासन घ्यावें, हा पुडलीकचा अधिकार आहे 'यदिच्छतो ब्रह्मचर्य चरन्ति' हें जीवनवाक्य आहे, का व्याख्यानवाक्य ?

प्रतिज्ञेच्या मागें कारणें नसतात, जीवन असतें, जीवनस्वामी असतो तुमचे-आमचे विचार बदलले म्हणून काय आपण अेकमेकाना सोडणार ! ब्रह्मचर्याची प्रतिज्ञा धार्मिक आहे, राजकीय नव्हे प्रतिज्ञाबद्ध तुम्ही पतित होणें म्हणजे पतित होणें आहे

अहो, सर्व देशात स्वार्थ, मत्सर, विषयपरायणता, विलास, याची आग लागली आहे बबाच्या पाण्यानें ती विझावयाची नाहीं दहा निर्मळ धर्मनिष्ठ माणसें असतील तरच यातून पार पडण्याची आशा आहे

आणि स्वराज्याच्या दृष्टीनें तरी काय ? छाती फोडून घेअून निराश होतो, तो राष्ट्रभक्त कसला ? स्वराज्य दूर गेलें व गगाधररावाचें नवें काम पटत नाहीं, म्हणून काय तुम्ही बायकोला मिठी मारून पडणार ? आणि मनाच्या दुर्बळतेनें लग्न करून घेअून दुर्बळ गुलामाना जन्म देणार ? तेजस्वी बालविधवा देखील म्हणते कीं 'माझें यौवन फुकट जावो, पण तें आता दुसर्‍यासाठीं नाही'

'केवळ प्रतिज्ञा' हे शब्द मला असह्य वाटतात केवळ आत्मा, केवळ अब्रू, केवळ पवित्रता यासारखेंच तें आहे भीष्मानें प्रतिज्ञा पाळून त्याचें

काय नुकसान झालें? आणि व्यासांनी नियोगद्वारा विषयलंपट पंडु, म्हातांध धृतराष्ट्र आणि दुर्बल ज्ञानी विदुर, यांना जन्म देऊन जगाचें अथवा भारत-कुळाचें कोणतें कल्याण केलें? निर्वीर्य विचित्रवीर्याचा निर्वंश झाला असता तर भारतवर्षाच्या गादीवर बसण्यास कोणीच मिळाला नसता काय?

प्रसंग गेला तरी हें सर्व लिहिलें आहे, कारण पुन विमूढभाव न व्हावा ब्राह्मण आहात, मोक्षधर्मी आहात, आत्मार्थी आहात, हें कधींहि विसरू नका लाज आणि प्रतिष्ठा दोन्ही तुच्छ वस्तू आहेत ज्या लोकांच्या अगडं पामरतेची तुम्ही सदैव कींवच करता, त्यांना तुमचें जीवन कसें दिसेल याचा विचार तुम्ही करावा? तें तुम्हाला समजण्याच्या लायकीचें तरी आहे काय?

तुम्हाला अजमेरला पाठविण्याच्या प्रयत्नात आहें त्यामुळें सध्या पुस्तकें पाठवीत नाहीं सध्या डोक्यातील अश्रद्धा आणि नास्तिकता यांचें मोठें पुस्तक काढून टाका म्हणजे मग इतर पुस्तकांना वाव मिळेल

काकाचा सादर
वंदे मातरम्

---

## २४

ॐ आश्रम, साबरमती
ज्येष्ठ शु १, रवि

प्रिय पुंडलीकजी,

तुम्ही आजारी आहा असें ऐकून फार चिंता लागली आहे तुम्हाला आजारी पडण्याचा अगोदर हक्कच काय होता? त्यात पुन्हा टायफॉईडनें? आतां लौकर बरे व्हा राष्ट्रीय महासभेची जबाबदारी तुमच्या डोक्यावर आहे, हें विसरलात काय?

आमच्या या प्रांतात काम अधिक होवो किंवा कमी होवो, पण निष्कारण चर्चा तरी नाहीं गुजरातच्या फलद्रूप जमिनींत मतभेदाची लागवड फारशी

झालेलीच नाहीं, व म्हणूनच येथें रचनात्मक कार्यक्रमाचें पीक इतर प्रांतांच्या मानानें बरें आहे. तुम्हांला महाराष्ट्राचा शेजार वारंवार बाधतो असें दिसतें. मी तर मराठी पत्रें वाचायचीं सोडून दिलीं आहेत. अिंग्रजी पत्रें देखील कोठें वाचतों म्हणा.

पूज्य श्री. बापूजी सर्वकाल कामात असतात. निसर्गानें झोप ठेवली नसती तर त्यांनीं काय केलें असतें कोण जाणे ?

काका

## २५

ॐ                                                    आश्रम, साबरमती
२७।१।२८

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें २१ ता. चें वणीहून लिहिलेलें पत्र पोहोंचलें. वर्तमानपत्रावरून तुम्हांला कळलें असेलच कीं, नाफेरवादी यांची सभा कायमचीच 'पुढें' ढकलली गेली आहे. तेव्हां गंगाधरराव येथें येण्याचा संभव नाहीं. मी कदाचित् फेब्रुवारी महिन्यांत बेळगांवला जाअून त्यांना भेटून येअीन. नक्की नाहीं. मात्र फेब्रुवारी महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत काठियावाडमध्यें अमरेली येथें गुजरात प्रांतांतील छात्रालयाचें संमेलन आहे, त्याला अध्यक्ष म्हणून जाणार आहें.

पू. बापूजींची प्रकृति साधारणपणें बरी आहे. हल्लीं त्यांनीं धान्याहार आणि दूध दोन्ही सोडलीं आहेत. दुधाच्या अैवजीं नारळाचें दूध घेतात. धान्याच्या अैवजीं दोन तोळे बदाम व पपअी वगैरे थोडीं फळें. बस अेवढा त्यांचा आहार; आणि रोज १६ पासून १८ तासांचें काम !

तुमच्या प्रकृतीस जर बरोबर न जपाल तर तो नैतिक गुन्हा होअील. मी अगदीं बरा झालों आहें.

काका

२६

ॐ गुजरात विद्यापीठ,
अहमदाबाद
मार्गशीर्ष शु १२, सोम
२४।१२।२८

प्रिय पुंडलीक,

तुमची तार पोहोंचली पू बापूजींना त्याप्रमाणें लिहिले आहे तारेनें तुमचें अभिनंदन करण्याचा माझा विचार होता, पण जाणून बुजून तो मी टाळला आणि तुम्हाला पत्रच लिहिणार होतों पुन्हा विचार आला कीं, तुमचें सविस्तर पत्र येईलच, मग लिहावें मनांत अशीहि शंका आली कीं, 'तडजोडीमध्यें काहीं मध्यस्थ धूर्तांनीं तुम्हाला फसविलें तर नसेल? आजवर तुमच्या पत्राची वाट पाहिली पत्र नाहीं याचें आश्चर्य वाटतें वर्तमानपत्रावरून समजलें कीं २५ टक्के सारा कमी केला आहे तुम्ही देवाण घेवाणची तडजोड केली हें चांगलें झालें, असें मला वाटतें अजूनहि जर तुम्ही त्यात फसला असाल, तर नाराज वाटून घेऊ नका उदारतेमुळें कधींहि कोणाचें आत्यंतिक नुकसान झालें नाहीं जर 'समेट' खराखुरा झाला असेल, तर तो अमलात आणण्याच्या कामीं तुम्ही उभयपक्षांना मदत केली पाहिजे यापुढें तुम्ही मिरज संस्थान सोडता कामा नये प्रजेची मनापासून आणि जबाबदारीनें अखंड सेवा करा राजालाहि योग्य प्रसंगीं मदत करा त्याचे दोष दुर्बलत्वाचे दोष आहेत ज्या नैतिक गुणांनीं प्रजेमध्यें तेज आलें ते गुण वाढतील असें करा. मध्यस्थ मंडळी श्रेयासाठीं किंवा नावासाठीं हपापली असतील, तर त्यांना संतुष्ट करा 'गरजारीं नटुतांचीं अतरें, भाग्य येतें तेव्हा बरें' आता तुम्ही महादेवासारखे फकीर वृत्तीनेंच रहा तुमच्या हातीं पैसा येईल, तो सढळ हातानें वाटेल तसा खर्चू नका हिशेब पैन् पै चोख ठेवा

तुमच्या कार्याविषयीं मला किती अभिमान वाटतो हे लिहावयास पाहिजे काय? सर्व श्रेय तुम्ही औंधकराला द्याल प्रथमपासून या कामात न पडण्याची मी सल्ला देत होतो, हें अेकपरी चांगलेंच झालें तुम्ही तुमच्या हिंमतीवर काम

पार पाडून सर्व जबाबदारी आणि सर्व श्रेय पदरात घ्यावें, त्यात तुमचा उत्कर्ष अधिकच आहे

चळवळीत जे लोक कळकळीचे व स्वार्थत्यागी वाटले असतील, त्याना जवळ करा व त्याना नेहमी समाजसेवेची कामें द्या वकील मंडळींशी गोडीगुलाबीनें वागालच सगळेच आपापल्यापरी उपयोगी असतात

बारडोलीचा तपास फारच उत्तम तऱ्हेनें चालला आहे शेतात कवडीचा नफा नसून उलट तोटाच आहे, निरुपाय होऊन शेतकरी शेती करतात, असें सिद्ध करणारा पुरावाच पुढें येऊं लागला आहे आपल्या प्रतिनिधींनी सर्व काम प्रामाणिकपणानें चालावलें आहे, त्याचीहि छाप चांगली पडत आहे पण हे सर्व आज खाजगी आहे तुमचें सविस्तर पत्र येऊं द्या

काका

---

## २७

ॐ                                                  गुजरात विद्यापीठ

अहमदाबाद

३१ ९ २८ शुक्र

प्रिय पुंडलीक,

तुमची प्रस्तावना काळजीपूर्वक वाचली मला बळ असतें तर तुमचेपणा कायम ठेवून ती नवीनच लिहून दिली असती परंतु आता मला फुरसत मिळविणें दुरापास्त झालें आहे तुमच्या प्रस्तावनेंतील जो भाग मी गाळला आहे, तो विचारपूर्वक गाळला आहे तुमच्या लाडक्या संस्थांचीं नावें वग ळणें यात कृतघ्नपणा नाहीं पण समजूतदारपणा आहे वेळी अवेळीं प्रत्यक्ष किंवा दूरचा संबंध बांधून आपल्या संस्थांचें नाव पुढें करणें म्हणजे प्रेमळ व म्हणून वेडगळ असलेल्या आयांचें अनुकरण करणें आहे कोणी जेवावयास बोलावलें म्हणजे जेथें तेथें आपल्या लाडक्याला बरोबर घेऊन जाणें यात लाडक्याची प्रतिष्ठा वाढविल्यासारखें होत नाहीं

या गोष्टी तुम्हाला समजवण्याच्या प्रयत्नात तुमच्या जिव्हाळ्याला मी दुखवीत आहें हें खरें, पण तुमच्या हातून तुमच्या संस्थाची शुद्ध सेवाच व्हावी, असेंच होअू नये, असें मला वाटलें संस्थाचें तेज त्याच्या प्रत्यक्ष कार्यानेंच पडलेलें बरें पण मला वाटतें, हा आपला मतभेद कायमचाच राहणार, आणि तुमची दृष्टि मला पटल्यावाचून राहणार. माझी प्रकृति बरी आहे

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

---

## २८

ॐ

गुजरात विद्यापीठ,
अहमदाबाद
श्रावण कृ १, शनि.
८ १-२८

प्रिय पुंडलीक,

तुमचें पत्र पोहोंचलें सरदार वल्लभभाअी पटेल आणि महादेवभाअी हे सिमल्यास गेले आहेत बापूजींना मी विनंती करावयाची आवश्यकता नाहीं त्यांना प्रजाहित समजतें त्यांना परभारें पत्र गेलें असेलच त्यांना योग्य वाटेल तसें ते करतील अेखाद दुसरें Pamphlet वाचून तेवढ्यावर अेखाया पक्षासंबधानें अभिप्राय ठरविणें आणि सहानुभूतिपर तारा ठोकणें, हें माझ्यासारख्याला योग्य होणार नाहीं ज्या त्या कामात माझ्यासारख्या दूर राहिलेल्या माणसानें लुडबूड कां करावी ? लढाअीला तोंड लागण्यापूर्वीच 'धावा, धावा, सहानुभूति पाठवा,' अशी ओरड तुम्हीं कां करता ? हिंदुस्थानातील प्रजा ब्रिटिश मुलखांत आणि देशी संस्थानात ओझ्याखालीं आणि जुलमाखालीं चेंगरून गेली आहे, हें कोणास माहीत नाहीं ? आणि राष्ट्रकार्यांत पडलेल्या लोकांची सहानुभूति प्रजापक्षाकडे स्वाभाविक रीतीनें असणार हेंहि कोणाला माहीत नाहीं ? पण पोकळ सहानुभूति न बोललेलीच बरी 'उद्धरे-

दात्मनात्मानम् ' हें तत्त्व बारडोलीनें शिकविलें नाहीं काय ? तुमचें म्हणणें रास्त असेल, तर त्याविषयींचा आग्रह दाखवा. बारडोलीप्रमाणें कांहीं बहादुरी करून दाखविली म्हणजे सहानुभूति, घरीं लक्ष्मी चालत आल्याप्रमाणें, चालत येअील.

*लोकांमध्यें शौर्य अुत्पन्न करण्यासाठीं संदेश हवे असतील तर ते गांधीजी* अथवा वल्लभभाअी यांच्या सारख्यांनीं स्वतःच तें काम हातीं घेअून देणें शक्य आहे. यापुढें गांधीजींचा संदेश त्यांच्या तोंडून लोकांना अैकावयाचा नसून गांधीजींनीं वल्लभभाअी सारख्यांना संदेश द्यावा आणि वल्लभभाअीसारख्यांनीं *लोकांत वावरून तो लोकांत पसरवावा.*

बारडोलीला सभा, अर्ज, विनंत्या, कौन्सिलांतील प्रश्नोत्तरें, वगैरे करणारे लोक निराळे होते. त्यांनीं हात टेकले तेव्हां वल्लभभाअींनीं काम हातीं घेतलें आणि फक्त सुरवातीला अेकदांच आश्रमांत येअून खाजगी रीतीनें बापूजींचा आशीर्वाद घेतला. बापूजींचा संदेश त्यांनीं कधींच मागितला नाहीं, बापूजींनीं दिला नाहीं. शेवटपर्यंत त्यांनीं बापूजींना मदतीस बोलावलें नाहीं. परस्पर पूर्ण श्रद्धा आणि विश्वास असल्यामुळें बापूजींचा अुपयोग अधिकाधिक झाला. सिद्धांत-भेदाची चर्चा त्यांना करावी लागली नाहीं. तुमच्याकडे कोणी वल्लभभाअी दाखवा, म्हणजे मग काम कसें होतें तें पहाल.

बाबांनो, हा धकाधकीचा मामला आहे ! जुनी हिंदी म्हण आतां उलटवल्याशिवाय आपला अुद्धार नाही. जर पगडी (अब्रू) सलामत ठेवतां आली तर किती शिरें खपतील याचा हिशेब करतां कामा नये.

बारडोलीमध्यें जो समजुतदारपणा आहे, मुख्य अब्रू संभाळण्यासाठीं लहानसहान अपमान आणि मरणप्राय अडचणी सोसण्याची तयारी आहे, तशी जर तिकडील लोकांची तयारी असेल, तर त्यांना पुढाऱ्यासाठीं तिष्ठत बसावयास नको. गंगाधरराव काय कमी आहेत ? आणि जर लोकांची तयारी नसेल तर गेलीं सहा वर्षें ज्याप्रमाणें येथील कार्यकर्त्यांनीं नम्र बुद्धि आणि अुग्र हृदय धारण करून रचनात्मक कार्य केलें, अथवा तुमच्या भाषेंत म्हणावयाचें म्हणजे आजीबाअीसारखें शीलसंवर्धनाचें, राजकारणाला पारखें असें, (Non-political) काम केलें, तसें करावयास निमूटपणें तयार व्हा.

तुमची नास्तिक धाओी अेक पाअूल देखील तुम्हांला पुढें नेणार नाहीं. जगांत तात्त्विक अन्याय अशी वस्तुच नाहीं. प्रजेला असह्य होअील तोच अन्याय.

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

---

# २९

ॐ

विद्यापीठ,

अहमदाबाद

आषाढ कृ. ६, रवि.

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें पत्र पोहोंचलें. मी अत्यंत खाजगी ठेवलें आहे. दुसऱ्या कोणीच वाचलें नाहीं व कोणालाहि दाखविणार नाहीं. मात्र आपण भेटूं तोंवर तें फाडून टाकण्याचा विचार नाहीं.

तुमचें पत्र वाचल्यानंतर तुम्हाला लिहिलेलें कार्ड रद्दच समजलें पाहिजे व माझा अभिप्राय सध्यां तहकूब करून ठेवतों.

तुमचें पत्र वाचून मला किती दुःख झालें असेल याची कल्पना होअीलच. स्वतःची बाज आपण होअून लंगडी करून ठेवावी, ही तुमची पद्धत मला आवडते. मी तसें वागण्याचा नेहमीं प्रयत्न करतों. "नैराश्यमेवाभयम्" हेंच सरतेशेवटीं खरें आहे. तुम्ही अगदीं मोकळे झालांत म्हणजे अेकदां मला भेटालच.

हातांत पैसे येण्याच्या पूर्वीच पत्रें लिहिलींत याचें आश्चर्य वाटलें. कारण 'There is many a slip, between the cup and the lip' तुमच्या मित्रांना गोळा कराल, त्या वेळीं तात्त्विक पत्र मी जरूर पाठवीन. तोंवर तुम्हांला अेक जुना श्लोक भेट म्हणून पाठवितों. पण तो सल्ला म्हणून किंवा टीका म्हणून मात्र नाहीं.

धर्मार्थं यस्य वित्तेहा वरं तस्य निरीहता ।
प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरादस्पर्शनं वरम् ॥

आजवर तुम्ही जितक्या गोष्टी स्पष्ट अथवा अस्पष्ट बोललां आहांत त्याचा अर्थ माझ्या मुळींच ध्यानांत आला नाहीं असें नाहीं. पण हे लोक म्हणतात तसेंच तंतोतंत नसावें, कांहीं गैरसमज असण्याचा संभव असावा, असें मानण्याचा मी सतत प्रयत्न केला आहे. तुमच्या या शेवटच्या पत्रानें त्या प्रयत्नाची कंबर ढिली झाली आहे.

विठ्ठलरावांविषयीं तुम्हीं लिहिलें, तें समजलें. मोठमोठीं आश्चर्यें गिळून गेलों, तेथें याचा काय पाड ?

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

## ३०

ॐ गुजरात विद्यापीठ,
अहमदाबाद
आषाढ शु. २, सोम.

प्रिय पुंडलीकजी,

प्रसंग पडल्यास जीवाचें रान करून कसाला अुतरण्याची तुमची तयारी आहे. पण प्रसंग ' पडलेला ' ओळखावा कसा ? मी म्हणतों, जीवाचें रान मुळींच करू नका. शेताचेंच रान करा म्हणजे पुष्कळ झालें.

शेताच्या भानगडीमुळें कुमरीला आश्रमाची स्थापना दिरंगाअीवर पडत आहे ! सार्वजनिक कामाला वाहिलेलें बाबासाहेबांचें आयुष्य निरर्थक खासगी कामांत वापरलें जात आहे ! अस्पृश्यांचे शाप पुंडलीकजींना लागत आहेत ! आणि पुंडलीकजींचा काका अस्वस्थ झाला आहे.

जमीन कोणाची? अीश्वराची. अथवा नांगरील त्याची. बाकी सर्व आपण चोर आणि शिरजोर ! माझेवर काकी आणि शंकर यांचा हक्क म्हणून मी

त्याना सर्व देऊन टाकलें, नाहींतर त्याचा भार मला अुचलावा लागला असता तुमचेवर कोणाचें ओझें आहे ? दोघा बधूची जबाबदारी तुमचेवर मुळींच नाहीं ते स्वतंत्र आहेत

आनदानें नादत असलेल्या कुळावर दावा करून, त्याला अशांत. भिकेला लावून, पांढरपेशाची भर करण्यात तुम्ही समाजसेवा कोणती करणार ? दावे विकत घेणारे वकील प्रतिष्ठित नसतात, प्रामाणिकहि नसतात त्याना दावा विकून तुम्ही पापाचे भागीदार होणार फुका सगम दावा देणारा आणि घेणारा दोघेहि चोर म्हटले आहेत स्वत.च्या मालकीची वस्तु पडून राहिली किंवा बिघडली तरी बेहेत्तर, दान दिलेली किंवा सोडलेली बेहेत्तर, पण प्रमाणाबाहेर सस्ती करून देणें, हें मालकी हकाच्या खानदानीला शोभत नाहीं

भाचा व मेहुणे याच्या आग्रहाला वश होअून लग्नकार्यांत शारीरिक मेहनतीची मदत किंवा सेवा जरूर द्यावी लग्नघटिकेस गैरहजर राहून नंतर पाचच मिनिटांनीं वधूवरांना आशीर्वाद दिला असतात तर अविहित झालें नसतें लग्नघरातील काहीं न खालें हें अुत्तम झालें पण अक्षता टाकण्याची क्रिया ब्रह्मचारी सन्यासी करीत नसतात पण आतां हा शास्त्रार्थ काय कामाचा ? सडेतोड पत्रानें तुम्ही रागावत नाहीं, म्हणूनच अेवढें तरी लिहिलें बाकी माझा अधिकार काय ?

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

---

३१

ॐ गुजरात विद्यापीठ,
अहमदाबाद

आषाढ शु १०, मगळ

प्रिय पुडलीकजी,

माझ्या पत्रामुळें तुम्ही रागावला असता तरी हरकत नव्हती पण तुमच्या शेवटच्या पत्रांतील थंडा जबाब वाचून मात्र फसेंसेंच वाटलें

माझ्या मतें असलें कर्ज अेस्टेटीबरोबर जोडलेलें असतें अेस्टेट सोडून दिली तर तें कर्ज आपोआप आपल्याला सोडून अेस्टेटीला चिकटतें गंगाधरराव म्हणतात की कर्ज करतानाच त्यांनीं तुम्हाला नको म्हटलें होतें कर्ज घर बांधण्यासाठीं निष्कारण केलें आणि तुम्हाला कर्जमुक्त करण्यासाठीं तीनचारशें रुपये खर्चावयासहि ते तयार आहेत

असें आहे तर तुम्ही मुक्त का होत नाहीं ? गंगाधररावाचेकडून अशा वेळीं पैसे घ्यावयास अडचण नसावी पुन्हां कर्ज करावयाचें नाहीं असा निश्चय मात्र केला पाहिजे तो तुम्ही केला आहेच

मी फक्त तात्त्विक गोष्टीच तुमच्यापुढें मांडणार, त्या तुम्हांला कमी समजतात असें नव्हे तेव्हा या बाबतींत मी अधिक तें काय लिहिणार ? बाबासाहेबाची मदत घेण्याच्या बाबतींत ते, तुम्ही व गंगाधरराव जाणे मला कांहींच समजत नाहीं ज्या ज्या वस्तू पुंडलीकाच्या देशसेवेच्या आड येतात त्याची मला चीड वाटणें स्वाभाविक आहे, अेवढेंच लक्षात घेऊन जर मी तुमच्या कामात निष्कारण ढवळाढवळ केली असेल, तर मला क्षमा करा

चि सुमन खूप खेळकर झाली आहे, व स्वच्छ, सडसडीत असल्यानें सर्वांनाच हवीशी वाटते

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्



## ३२

गुजरात विद्यापीठ,

अहमदाबाद

प्रिय पुंडलीक,

तुमचें मिरजेहून लिहिलेलें पत्र मिळालें तेथील रिपोर्ट लिहिण्याचें काम तुमच्या वाट्याला आलें नाहीं ही अीश्वरी कृपाच होय नाहींतर त्यातच गुरफटला असता

जमनालालजी परवा येऊन गेले. त्याना आपलेकडून अजून स्पष्ट ' होय, नाहीं ' याचें अुत्तर न मिळाल्यामुळें त्यानीं आपली मनात किंमत केली मी माझ्या मनात म्हटलें : आपण बोलून चालून लहान माणसें, आपला जीव लहान हिंमत करण्याची सवय नाहीं कार्यांत एकनिष्ठा असती तर केंठेहि रेंगाळलों नसतों

अजून तरी अेस्वाचें होय नाहीं, तारेनें मला व जमनालालजी याना मुनअींच्या पत्त्यावर कळवा पुढें त्याचेकडे पोहोंचण्यास चार ( फक्त चारच ) दिवस लागले तर सभाळतां येअील डिसेंबरपर्यंत काहीं तरी काम- अस्पृश्यतानिवारणाचें व मंदिरप्रवेशाचें-नाव घेण्याजोगें काँग्रेसपुढें माडलें पाहिजे

नाहीं म्हणण्याचीहि तुम्ही हिंमत करू नये ? अेकदा काय तें ठरवा व कामाला लागा

सुज्ञेषु किं बहुना !

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

---

३३

३० अहमदाबाद

८ ६ १९२८

प्रिय पुंडलीकजी,

तुमचीं पत्रें पोहोंचलीं कोशाच्या बाबतींत तुम्ही मला आपला अगदीं सेक्रेटरी बनविला आहे ! मला तितका वेळ नाहीं आणि अुत्साहहि नाहीं तुमचा निरोप त्यागभूमीला कळविला आहे. यापुढें तुम्ही वैजनाथ महोदय- त्यागभूमि, अजमेर, याचेशीं सरळ पत्रव्यवहार करावा मी मध्यें राहू अिच्छित नाहीं आपली बोधाची भनिष्ठा त्यात रहात नाहीं

मला वाटतें, अर्पणपत्रिकेंत कविताहि नसाव्या आणि विशेषणेंहि नसावीत. पवित्र संबंध चव्हाट्यावर घेऊन जाणें यांत व्रीडासाहित्याचा दोष येतो. वेळ असता तर गीतेच्या श्लोकांविषयीं लिहिलें असतें. तूर्त पांचपट आहे. पू. गंगाधररावांना सादर प्रणाम.

काका

## ३४

ॐ

गुजरात विद्यापीठ,
अहमदाबाद
२१-९-२८, रवि.

प्रिय पुंडलीकजी,

संयम दाखविला पाहिजे, तेव्हा लोक पुढाऱ्यावर चिडतात, त्याला नेभळट म्हणतात आणि जेव्हा तेजस्विता प्रगट केली पाहिजे, तेव्हा लोक गळाठतात आणि पुढाऱ्याला अव्यवहारी, ध्येयवादी म्हणतात अशा लोकांचें पुढारीपण करणें कठीण असतें

बारडोलीच्या चळवळीचा अितिहास महादेवभाअी लिहीत आहेत. लवकरच तयार होअील तुम्हाला कांहीं विशेष माहिती हवी असल्यास 'जुगतराम दवे, मंत्री, प्रकाशन विभाग, स्वराज्य आश्रम, बारडोली' या पत्त्यावर मागवा. बारडोलींत सरकारची फेरतपासणी सुरू होअील त्या वेळीं तुमच्याकडील कोणी जबाबदार विश्वासू माणूस पहावयास जाअील तर पुष्कळ फायदा होअील माहिती कोणती गोळा करावी, कशी गोळा करावी, वगैरे स्थानिक परिस्थितीप्रमाणें तुमच्या तिकडील लोकांनीं ठरविलेलें बरें या कामीं अितराची अकल फार दिवस पुरत नाहीं

तुम्ही चळवळींत भाग घ्यावा कीं नाहीं, याविषयीं मी कांहींहि सल्ला देणें अयोग्य आहे गंगाधरराव जाणे व तुम्ही जाणे तुम्हा दोघांमध्यें नेहमींच मी पडणें, हें तुम्हालाहि शोभत नाहीं आणि मलाहि शोभत नाहीं.

बारडोलीच्या तपश्चर्येचा फायदा तुम्हाला मिळावा, अशी तुमची अपेक्षा तुम्ही लिहिता अेकाच्या तपश्चर्येनें दुसऱ्याला प्रेरणा मिळू शकते, फायदा मिळत नसतो आणि जो मिळतो तो फायदा नसून बोजाच असतो, असा नेहमींचा अनुभव आहे. अेकानें मरून स्वर्ग मिळवला म्हणजे दुसऱ्याला ती वाट सोपी होते, हें खरें, पण स्वर्गाच्या वाटेवर कोणी कोणाचा हात धरून नेअू शकत नाहीं

तुमच्या तेथें जी चौकशी होअील ती आपला पक्ष सजविण्यासाठीं वकिली वृत्तीनें होतां कामा नये पण प्रतिपक्षाच्या बाजूला अधिकाधिक सत्य किती आहे, याचा विचार करूनच ती केली पाहिजे

माझीं पत्रें प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतीनें प्रसिद्ध करण्यासाठीं नसतात फक्त मित्रमंडळींसाठींच तीं असतात त्यांतील अनुकूल वाटणारा भाग तेवढाच दुसऱ्यांना दाखविण्याची चूक तुमच्या हातून होणार नाहीं ही खात्री आहे

मान क्षणिक वेगाला वश होऊन केलेल्या चुकांविषयीं तुमचा पश्चात्ताप क्षणिकच असण्याचा आणि स्वत.च्या चुका क्षुल्लक मानण्याचा संभव तुमच्या वृत्तींत आहे किंवा नाहीं, तें तपासून पहा. नाहींतर चपारण्याचे सत्याग्रही वीर आणि सत्य आणि ब्रह्मचर्य याचें व्रत घेणारे देशसेवक म्हणून लोकानीं तुमच्या तत्रानें चालावें आणि तुम्ही लहान मोठ्या प्रलोभनाला बळी पडून तत्त्वाशीं तडजोड करावी ! असें झालें म्हणजे सत्याग्रहाच्या रस्त्यात अपयशाची हमी घेतल्यासारखेंच होईल तुम्हाला धोक्याची सूचना मी देऊं नये तर कोणी द्यावी ?

आपला

काका

  

## ३५

ॐ                                गुजरात विद्यापीठ,

अहमदाबाद

८-१०-२८, शनि.

प्रिय पुंडलीक,

तुमचें पत्र पोहोंचलें सत्याग्रहाच्या लग्नाची तयारी म्हणे शेंडीपासून. जमिनीविषयक माहितीचें अज्ञान, सरकारी अमलदाराच्या रगड्याचें अज्ञान, संस्थानच्या प्रजेची–शेतकरी वर्गाची आजवर कोणतीच सेवा न केलेली, अशा परिस्थितीत सत्याग्रह सुरू करण्याचा किंवा सत्याग्रहाची तयारी करण्याचा पुंडलीकजींना अधिकार नाहीं, असा माझा स्पष्ट अभिप्राय आहे तुम्ही आजपासून शेतकऱ्याच्या सेवेची तयारी करा, त्याची परिस्थिति समजून घ्या त्याच्या स्थितीचें वास्तविक पृथक्करण करून त्याचेपुढें, सरकारपुढें आणि जगापुढें मांडा त्याच्या बारीकसारीक दु खाचा परिहार करण्यासाठीं सतत श्रम करा तुमच्या सेवेनें त्याचा विश्वास संपादन करा म्हणजे ८–१० वर्षांनीं लोकांच्या हातून सत्याग्रह करवणें शक्य होईल

वल्लभभाअी जातीचे शेतकरी, शेतकऱ्यामध्यें वाढलेले, मॅट्रिक होअून सनदी वकिलाचें काम करू लागले. दोघा भावांनीं बॅरिस्टरीचा विलायतेचा खर्च झेपेल अितके पैसे मिळविले, तोंवर लोकांची स्थिति त्यांना वालवाल समजली. बॅरिस्टर झाल्यानंतर कायदा, अमलदार आणि लोकस्थिति या तिहींचा चांगला अनुभव घेतला अहमदाबादमधील दंगा, त्यानंतर रेलवेचे रूळ तोडून लष्कर भरून जाणारी गाडी अुलथून पाडण्याच्या कटांतील लोकांचा बचाव, म्युनिसिपालटीची चार वर्षे अेकनिष्ठ सेवा, खेडा सत्याग्रहात गांधीजींचे मदतनीस म्हणूनचा अनुभव, गांधीजींच्या गैरहजेरींत सत्रध प्रांत संभाळण्याची आणि मतभेदाच्या वावटळींतून गुजरातला वाचविण्याची कामगिरी, नागपूरच्या व बोरसदच्या सत्याग्रहात लढण्याची आणि शिष्टाअीची दाखवलेली कुशलता, आणि गतवर्षी पुरानें प्रजा वाहून जात असता अविश्रांत खटपट करून दाखवलेलें प्रजावात्सल्य–या सर्वांच्या शेवटीं बारडोलीच्या सत्याग्रहात ते पडले व तें देखील सभाळून सभाळून नाअिलाज म्हणून पण पडल्यानंतर त्यांनीं आपल्या सोळाहि कळांचा प्रकाश पाडला. कर्नाटकात सत्याग्रह सुरू करण्यायोग्य व्यक्ति अेक गोविंदराव याळगी तुम्ही आज सत्याग्रहाचें पुढारीपण घेणें म्हणजे,—'rush in, where angels fear to tread'

या कामीं तुम्ही गंगाधररावांची सल्ला घेण्याचें टाळणें म्हणजे मला प्रथमचा अपशकून वाटतो तुम्हींच मला वेळोवेळीं धोक्याची सूचना द्यावयास आपण होअून सांगता म्हणून सुरुवातीलाच स्पष्ट शब्दांत तुम्हाला सूचना दिली आहे.

तुमच्या स्वभावाविषयीं मी सुचवलेल्या पृथक्करणांत तुम्ही जी सुधारणा केली आहे, ती मी स्वीकारतों

मीं वर लिहिल्याप्रमाणें जर तुम्ही मिरजेच्या शेतकऱ्याच्या सेवेचें काम सुरू कराल, व वर वर्णिलेल्या मर्यादाच योग्य पालन कराल, तर तुम्हाला जीवनाचें खरें क्षेत्र मिळाल्यासारखें होअील, आणि गंगाधररावहि तुम्हाला आशीर्वाद देतील तुम्हाला तुमचे क्षेत्र सापडल्यानंतर तुम्ही त्याकडेच रहावें अथवा त्याच्याच सल्ल्यानें चालावें, असें मात्र कधींच म्हणणें नव्हतें

आणि गंगाधररावानाहि तसें वाटणें शक्य नाहीं मात्र जें कराल त्यांत त्याचा आशीर्वाद मिळवूनच करा माझीं या खेपेचीं दोन्ही तिन्ही पत्रें त्यांना दाखवा व त्यांचा आशीर्वाद मागा तो जरूर मिळेल

आपला

काका

ता क — मीं सुचविलेल्या पद्धतीनें प्रजासेवा करावयाची असेल, तर सुरुवातीलाच, सत्याग्रहाची तयारी करण्याचा आमचा उद्देश नाहीं असें तुम्हाला स्पष्टपणें जाहीर केलें पाहिजे तुम्ही किंवा तुमच्यासारखे कोणी पुढारी होणार आहेत अथवा होते अशा समजुतीनें मीं ही सूचना केली आहे कोणी जबाबदार, अनुभवी पुढारी आज यात पडणार असेल तर मला त्याविषयीं काहींच म्हणावयाचें नाहीं

काका

---

## ३६

ॐ गुजरात विद्यापीठ,

अहमदाबाद

१४ १० २८, रवि.

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें ता १२ चें पत्र पोहोंचलें तुम्ही मन मोकळें करून मला पत्रें लिहिता, यात तुमचा सद्भाव स्पष्ट होतो माझा अभिप्राय कायम आहे रामशास्त्री प्रभुणे याना हसणायाला हसावें असें मानणारा मी नाहीं रामशास्त्री बनल्यानतर 'त्याला पूर्वी हसावयास नको होतें' अेवढें समाज कबूल करील पण अेक रामशास्त्री निघाला म्हणून प्रत्येक उत्साही तरुणामध्यें समाजानें भावी रामशास्त्र्याचेंच दर्शन केलं पाहिजे, असा नियम करता यावयाचा नाहीं तुमच्या अंगात पुढारीपण कधींच यावयाचें नाहीं, असें मानण्याअितका तुमचेविषयीं मी नास्तिक नाहीं तुम्हाला तुमचें क्षेत्र

सांपडलें असल्यास आजन्म त्याला चिकटून राहा. फक्त तुम्हीं पुढारी होण्यासाठीं सेवारूपी जी साधना केली पाहिजे, त्या जातीची किंवा तोलाची साधना तुमच्या हातून यापूर्वी घडली नाहीं, अेवढेंच माझें म्हणणें आहे. तुमच्या अेकस्याचा बळी देअून जर भागेल तर माझें कांहींच म्हणणें नाहीं. वाटेल ती किंमत देअून अनुभव खरीदण्याची अीश्वराच्या घरीं प्रत्येकाला मोकळीक असली पाहिजे. पण तुम्हीं अननुभवी; शेतकऱ्यांचा पुढारीपणा पतकरल्यानंतर शेतकऱ्यांनाहि तुमच्या बरोबर सोसावें लागणार. ती सर्व आपत्ति समाजाला पोषक होअील अेवढी दृष्टि ठेवली पाहिजे.

शिवऱ्यांचा व माझा फारसा परिचय नाहीं. त्यामुळें त्यांच्या शक्ति, अशक्तीची मला कल्पना नाहीं. तुम्ही म्हणतां कीं 'ते दोन तीन महिने स्वतःच्या पोटाच्या अुद्योगाला जाणार आहेत!' मला हें कांहीं समजत नाहीं.

तुमच्या कळकळीसंबंधानें व आत्मसमर्पणाच्या अुत्कंठेसंबंधानें मुळींच शंका नाहीं. पण तुम्हीं सत्याग्रहापूर्वीच्या सर्व विधींमधून पसार झालें पाहिजे. तुम्ही अजून अधिकाऱ्यांना भेटलां नसाल, श्रीमंतांकडे भेटीसाठीं वेळ मागितला नसेल, पत्रव्यवहारहि केला नसल. तुमच्यासंबंधानें त्यांना यथार्थ कल्पना कशी यावी? श्रद्धा, प्रज्ञा, अुद्योग आणि धीर (Patience) या चारी गुणांचा परिचय याल, तेव्हां तुमच्या म्हणण्याचा परिणाम होअूं लागल.

लोकांतील दुफळी मोडून टाकण्याची तुमची खटपट स्तुत्य आहे. तुम्हाला कायद्याचें ज्ञान असलें पाहिजे, असें माझें म्हणणें नाहीं. न्याय, नीति, धर्म आणि लोकव्यवहार या गोष्टींचें ज्ञान असलें म्हणजे बस्स आहे. तुम्ही जें कांहीं कराल त्याचा थोडक्या शब्दांत, पण कांहीं न गाळलेला असा गोषवारा तयार करून तो वेळोवेळीं बापजींकडे पाठवून देत चला. पण त्या बरोबर त्यांना लिहा कीं, 'यंग इंडिया'त आपण कांहीं लिहावें असा आमचा आग्रह नाहीं. फक्त आमचें काय आपल्या ध्यानांत असावें, अेवढ्याच साठीं लिहीत आहें.

*गंगाधररावांची सल्ला घेण्याचें तुम्हाला सुचत नसेल तर न सुचो.* पण त्यांना वेळोवेळीं सविस्तर हकीकत कळवीत रहाणें तुमचें कर्तव्य आहे. या निष्काम कर्माचें फळ मिळाल्यावांचून राहणार नाहीं.

गंगाधररावांना मीं लिहिलें आहे कीं मिरज प्रकरणांत तुमचा-माझा पत्रव्यवहार झाला आहे त्यांना मीं सारांश लिहिला नाहीं माझीं पत्रें त्यांना दाखविल्यानें खरोखर तुमचें नुकसान होणार नाहीं अुलट संभव असा आहे कीं, ते तुम्हाला मनापासून सल्ला देतील 'काम सुरू केल्यानंतर तुमच्या मित्रांना किंवा अनुयायांना माझीं पत्रें दाखविण्यांत अर्थ नाहीं,' हा तुमचा निश्चय अयोग्य नाहीं त्यांना कोणतेंच पत्र दाखवूं नका म्हणजे झालें. तुमच्या वागण्यांत मी अुद्दामपणा किंवा अहंकार पहाणें शक्य नाहीं महादेवभाअींचें पुस्तक तयार होण्यांत किती तरी विघ्नें आहेत त्यांना वेळ कादणेंच कठीण झालें आहे तुमचीं पत्रें त्यांना दाखविण्याची आवश्यकता मला वाटत नाहीं तुम्ही जर बापूजींना लिहाल तर महादेवभाअी अनायासें वाचतीलच. सत्य, अहिंसा व निर्भयता यांवर तुमची चळवळ अुभारणार आहात, मग काकाच्या किंवा गंगाधररावाच्या अभिप्रायाला काय म्हणून भ्यावें ?

बारडोलीचें प्रकरण पुन्हा पेट घेणार नाहीं असें खात्रीनें सांगवत नाहीं आणि सरकारनें जर दगा दिला, तर फारच आणीबाणीचा प्रसंग येअील, असें आज दिसतें

प्रकृतीस जपून असा रोज अीश्वराची प्रार्थना सकाळ संध्याकाळ करीत जा मधून मधून अुपवासहि करा आणि अीश्वराची करुणा भाकून त्याची प्रेरणा मिळवा

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

--- --- ---

## ३७

गुजरात विद्यापीठ,
अहमदाबाद
आश्विन इ ५, शुक्र.
७-११ २८

प्रिय पुंडलीक,

तुमचें पत्र पोहोंचलें तुम्ही लिहिता कीं तुमच्या करण्या-वागण्यामध्यें दोष दिसत असल्यास कळवावा हें जरा कठीण आहे दर पत्रात काहींना काहीं चुका काढत बसल्यानें कर्णाच्या सारथ्याप्रमाण तेजोभगाचें पाप लागावयाचें, आणि दोन दोष दाखविले तर बाकीचें सर्व वागणें मान्य आहे, असा अर्थ होतो मी सुरुवातीलाच माझा अभिप्राय सांगितला आहे कीं, पुष्कळ सेवा-आणि तीहि दोन्ही पक्षाची-असली तरच असले तीव्र प्रयोग सोपे जातात

धरणें घेऊन बसणें सोपें नाहीं कसलेंहि उत्तर मिळालें तरी चालेल, पण उत्तर पाहिजे, असेंच का तुम्ही म्हणणार? त्यासाठीं ओवढें मोठें धरणें कशाला? अनुकूल उत्तर मिळेतोंपर्यंत उठणार नाहीं, असें म्हटल्यास तें खरें करून दाखविण्याचा धीर आणि धैर्य पाहिजे, नाहींतर सर्व खटाटोप भयंकर। पण शेवटीं ओम् फस्! असें होतें पोकळ दम दिल्यानें आणि माघार घेतल्यानें प्रजा आणि पुढारी या दोहोंचा कार्यनाश होतो तेजोभंग तर होतोच धरण्याच्या पुढचें पाऊल नसी झाल्याशिवाय 'धरणें बसणें' ही भयंकर-पण हास्यास्पद-गोष्ट होईल आणि धरण्यावर चिडून अमलदार दडेली ठेवील करू शकतील तुमच्या कार्यांत तुमची हिंमत तोडण्याचा माझा विरादा नाहीं जबाबदारीचीं कामें स्वत च्या जोखमीवर घेतल्याशिवाय राष्ट्रांत कर्तबगारी तरी कशी यावी?

तुमच्या पूर्वीच्या ओका पत्रात होतें कीं 'सारा देत नाहीं, असं म्हणण्याची चळवळ आम्हाला करावयाची नाहीं, किंवा तूर्त तरी अशी भाषा आमच्या नजरेसमोर नाहीं' त्याचें काय झालें? मला दिसत होतें कीं

हिशेब करून ती बेरीज लोकांपुढें मांडा आणि अशी ही वाढ वर्षानुवर्षे चालणार आहे, हेंहि त्याच्या नजरेस आणा

प्रजेकडून घेतला जाणारा कर प्रजेच्या हितार्थ खर्च झाला पाहिजे हें तर खरेंच, पण अेवढें पुरेसें नाहीं पण प्रजेच्या अिच्छेप्रमाणें, प्रजेच्या प्रतिनिधिद्वारा तो खर्च झाला पाहिजे, ही गोष्ट लोकांपुढें मांडण्याजोगी आहे पण तुम्ही त्या भानगडींत पडू नका तसें केल्यानें तुमच्या चळवळीला राजकीय स्वरूप येअील आणि चळवळ राजकीय झाली म्हणजे तिला हाणून पाडण्यास वेळ लागणार नाहीं शेतकऱ्यामध्ये राजकीय वृत्ति अजून आली नाहीं आणि म्हणून आपल्या राजकीय आकांक्षा कितीही योग्य असल्या तरी त्यासाठीं शेतकऱ्याचा बळी देणें योग्य होणार नाहीं

यासाठीं तुमची चळवळ राजकीय करू नका 'शहाणे' वकील लोक ही चूक हटकून करणार आणि तुम्हाला गोत्यांत आणणार चळवळ खरोखर पोटापाण्याची आहे, आणि तशीच राहिली पाहिजे

प्रत्येक शेतकऱ्यानें शेतजमीनीतून अुत्पन्न किती, शेतीपायीं त्याला किती खर्च करावा लागतो, त्याचा घरखर्च किती असतो आणि कसा चालतो, शेतीचें अुत्पन्न शेतकऱ्याच्या हातीं येण्यापूर्वी त्याची किती नासाडी होते, सुकाळ दुष्काळ यांचें प्रमाण किती, सरासरी अुत्पन्न कसें धरावयाचें, वगैरेची माहिती आतापासून मिळवून ठेवा अत्यंत प्रामाणिक आणि हुशार अशा कोणा साथीदाराकडून हें काम चालू ठेवा अैनवेळीं उपयोगी पडेल पंच नेमण्याच्या वेळीं तो तटस्थ असावा आणि चांगला प्रतिष्ठितहि असावा, आणि दृढतेच्या बाबतींत सशयास्पद नसावा, आणि तो निःस्पृह तर असलाच पाहिजे

तडजोडीच्या सुरुवातीनंतर या सर्व गोष्टींचा विचार करावयाचा तोंवर लोकांमध्यें फिरून फिरून लोकांना मजबूत करणें, चळवळीचें रहस्य पुन्हा पुन्हा समजावून सांगणें, हें अत्यंत आवश्यक आहे वाऱ्याच्या वेगानें सर्वत्र फिरत रहा मात्र शरीरप्रकृतीला अुत्तम सभाळा आहार कमी ठेवा, म्हणजे सर्व कांहीं पचून जाअील व अनियमितपणा बाधणार नाहीं. जहाल भाषणें

करू नका, आणि तेजस्विता सोडूं नका. इतकें करून तुम्ही जेलमध्यें गेलात तर तुमचें काम संपलें. महाराष्ट्रांत कांहीं राम असेल तर तुमचें काम उचलून धरणारा कोणी तरी जागा होईल. लोकांनीं कोणत्याहि प्रसंगीं, कांहीं झालें तरी शरीरबळ वापरावयाचें नाहीं, दंगा करावयाचा नाहीं, हें पुनः पुनः त्यांना सांगा. दंग्याचा संशय आला तरी देखील आपण एकदम चळवळ सोडून जाऊं, असें निक्षून सांगा व त्याप्रमाणें करण्याची तुमची तयारी असूं द्या. लोकांना स्पष्टपणें सांगा कीं, प्रश्न कांहीं धार्मिक अहिंसेचा नाहीं, पण प्रजा-धर्माचा आहे. अनत्याचार ही प्रजाकीय चळवळीची व्याकरणशुद्धि आहे. तिच्यावांचून चळवळ चालविणें अशक्य आहे.

तुमचें एक प्रसिद्धि (Publicity) खातें असलें पाहिजे. त्या खात्यामार्फत खऱ्या खऱ्या बातम्या तुमच्या स्वतःच्या देखरेखीखालीं प्रसिद्ध व्हाव्या. लोकांच्या हातून चूक झाल्यास ती कबूल करण्यास विलंब करूं नये आणि सामान्य चुका झाल्या तर तिकडे दुर्लक्षहि करूं नये किंवा वाहवतनहि जाऊं नये. जाहिरातवाल्यानें वागाडंबरांत शिरूं नये. लोकांचा उत्साह वाढेल, निश्चय टिकेल, असे मोजके चार शब्द त्यांत असावेत. विरुद्ध पक्षाचा चांगुलपणाहि नजरेस आल्याबरोबर स्वीकारावा, म्हणजे चळवळीं-तील कडूपणा नाहींसा होतो.

मला वाटतें, फाजीलपणा गाजवून मी तुम्हाला लांबलचक स्मृति लिहून पाठवीत आहें. माझी सहानुभूति आणि आशीर्वाद इतर रीतीनें मी कसा व्यक्त करणार ? तुमच्या चळवळीविषयीं सांगोपांग माहिती मिळविण्याचीहि मला फुरसत नाहीं. मी सल्ला ती काय देणार ?

' दीनन दुखहरन देव ' तुमचें कल्याण करो !

काका

## ३९

ॐ

गुजरात विद्यापीठ,
अहमदाबाद
२-१-२९, बुध.

प्रिय पुंडलीक,

तुमचें ता. २७-१२ चें पत्र पोहोंचलें. 'व्यर्थ गैरसमज नको' हें हस्त-पत्रक वाचलें. तें तुम्हाला शोभास्पदच आहे. त्यांतील संयम व धोरण दोन्हीं मला आवडलीं. आपलेजवळ जेवढें भांडवल असेल तेवढ्यावरच व्यापार चालविला पाहिजे.

तुमच्यावर १२४ अचा खटला केला असता तर मौज झाली असती. पण तुम्हीं वकील ठरवावयास नको होते. या चळवळीचें रहस्य वकील करून घालवून बसलां असतां. पण अीश्वरानेंच बाजू संभाळली.

मिरजेच्या रयतांनीं तुम्हाला बाजूला ठेवण्याचें कबूल केलें व परभारें तडजोड केली, हें मात्र त्यांना शोभत नाहीं. बारडोलीला असा खेळ सरकार-नें केला होता. वल्लभभाअींनीं सांगितलें कीं, परभारें भागत असेल तर बाजूस होण्यास मी तयार आहें. कांहीं नामदार लोक मध्यें पडले. पण त्यांना वल्लभभाअींना विचारूनच चालावें लागे. आणि खुद्द रयत लोक तर वल्लभ-भाअींना बाजूला ठेवून कोणाशीच बोलावयास तयार नव्हते. 'आम्हीं रयताशीं बोलू, बाहेरच्या लोकाचें येथें काम नाहीं,' असें गव्हर्नरनें म्हटलें आणि प्रजेच्या प्रतिनिधीस भेटावयास बोलावलें. तेव्हां त्यांनीं आपल्यापैकीं अेकासहि न पाठविता वल्लभभाअी आणि अितर सर्व 'बाहेर' च्याच लोकां-ना प्रतिनिधी म्हणून पाठविले.

मिरजेची रयत जर म्हणते कीं 'आम्हाला विचाराल तर आम्ही फेर चौकशीच मागणार. आम्हाला दुसरें तिसरें समजत नाहीं. तडजोड अवश्य करूं, पण ती पुंडलीकच्या मार्फत होअील तरच.' तर त्यांना शोभलें असतें, व तुमची विग्रह आणि संधि या दोन्ही बाजूची शक्ति साक्षी प्रगट झाली असती.

कोणतीहि चळवळ हातीं घेतली कीं लागलीच तिला लागणारा पैसा गोळा असावा अर्थात् पैशाचें काम शक्य तितकें टाळावें अत्यंत काटकसर करावी पण प्रजेला प्रथमपासून समज पाडली पाहिजे कीं आपल्यावतीनें जे काम करतात त्याना सढळ हातानें पैसा दिलाच पाहिजे नाहींतर चळवळ 'दरिद्री' आणि नेजबाबदार होत वकिलांना लोक पैसे कसे मुकाट्यानें देतात !

मात्र पैसे गोळा झाले म्हणजे लोकाचे डोळे फिरतात असें होऊं नये तुमचे शिखरे या चळवळींत कोठें दिसलेच नाहींत, याचें कारण काय ?

चळवळीचा अंत समाधानकारक रीतीनें झाला, याबद्दल अेक अुत्सव केला पाहिजे व त्यात पुढलीकाना अेक पर्स दिली पाहिजे व ती त्यानीं विश्वासाच्या लोकाकडे सार्वजनिक कामासाठीं म्हणून दिली पाहिजे पुढलीकाच्या मर्जीप्रमाणें सार्वजनिक कार्यासाठीं तिचा विनियोग व्हावयाचा

या चळवळीमुळें अेकंदर रयतेचे मिळून किती रुपये वाचले व तीस वर्षांत त्याना किती लाभ झाला, याचा आकडा काढून तो लोकांपुढें मांडला पाहिजे व अेवढ्या मोठ्या रकमेचा दावा कोर्टांत लढवावयाचा असता तर किती खर्च झाला असता, याची कल्पना लोकाच्यापुढें मांडली पाहिजे मात्र यात कोठेंहि अतिशयोक्ति नसावी

हें सर्व तुम्हांला करावयास हरकत नाहीं फक्त पर्सची कल्पना शिवऱ्यानीं किंवा इतर कोणीं मांडली पाहिजे तुम्ही आतां रयतेच्या सेवेसाठीं सतत खपलें पाहिजे रयतेकडे पैसे मागावयास संकोच करूं नका आणि मिळतील ते पैसे अितर लाडक्या कामात खर्चू नका यात चुकलात तर तुमच्या सार्वजनिक जीवनाला मूठमाती मिळालीच म्हणून समजा झालेली तडजोड सर्वांनीं मान्य केलीच पाहिजे जे लोक तडजोड मोडू पहातात, त्याना कसून विरोध करा, म्हणजे तुमच्या चळवळीचा शाहजोगपणा आपो आप सिद्ध होईल

काका

# ४०

ॐ                    गुजरात विद्यापीठ,
अहमदाबाद
११-१-२१,शुक्र

प्रिय पुंडलीकजी,

'तडजोड' हें हस्तपत्रक आणि तुमची दोन पत्रें मिळाली संस्थानामध्यें प्रजेच्या कामात वकील करणें अयोग्य नाहीं पण १२४ अ कलमासाठीं आणि तेंहि तुमच्यावर खटला असेल त्या वेळीं वकील करण्याचा विचार करणें म्हणजे तुमच्या कार्यांतील बरेंच गांभीर्य आणि अुदात्तता कमी करण्यासारखें झालें असतें तुमचें भांडवल म्हणजे तुमची पुण्याअी, त्याचेवर प्रहार न व्हावा

तुम्ही विरोधी लोकामध्यें देखील अेकटे निर्भयपणें हिंडता, हें यथायोग्य आहे तुमचेकडून याहून कमीची अपेक्षाच नाहीं

'तडजोड' या हस्तपत्रकाचा विचार करीत होतों आणि 'गैर-समज नको' हें हातात आलें, त्यावरून धोंडाळा झाला तेव्हा आता वरील ओळी रद्द समजाव्या 'तडजोड' हें हस्तपत्रक उत्तम आहे त्यात पुडलीक दिसून येतात तरी पण 'माझें तडजोडीविषयींचें मत' या पॅरेग्राफापैकीं शेवटच्या दोन ओळी अथवा शेवटच्या पाच ओळी आजच्या परिस्थितींत न लिहिल्या असत्या तर बरें झालें असतें तरी स्पष्टपणें लिहिलें हें अेका अर्थी चांगलेंच आहे

तुम्हाला भेटण्यांत मला आनंदच होअील पण मला वाटत, अजूनहि काहीं महिने-अथवा अेक दोन वर्षे म्हणा वाटल्यास-तुम्ही मिरज सोडतां कामा नये You can't rest on your oars. होडीला गति मिळाली म्हणून वल्हीं थांबविलीं आणि श्वास घेण्यास थांबला तर होडी उतरणीला लागावयाची कारण तुमची होडी प्रतीप जात आहे, हें विसरू नका मिळविलेलें सगळें घालवून बसाल अखंड जागृति हा राजकारणाचा पहिला

थडा आहे राजकीय विजय सामाजिक दोषामुळें हातचा जातो किंवा मातीमोल होतो. अेक वर्षभर कसून काम करा काम करता करता आजारी पडून नाहींसे झालात तर तुमच्या राखेंतून नवे पुंडलीक तयार होतील

शिवऱ्याना पर्स देण्याची सूचना करणें ही युक्ति अगदीं पारदर्शक आहे शोभावयाची नाहीं पण या बाबतींत तुम्हाला शेवटीं सुचेल तेंच खरें काम नि.स्वार्थ परोपकाराचें आहे त्यांत वेअब्रू थोडीच होणार आहे ? तरी पण शिवऱ्याचा पत्ता मला कळवाल तर त्याना पत्र लिहून सुचवीन तुम्ही ठरवाल तसें

काकाचा शुभाशिष

---

# ४१

ॐ गुजरात विद्यापीठ

अहमदाबाद

३१-१ २९ गुरु

प्रिय पुंडलीक,

तुमचें हिंदी पत्र मिळाल्याबरोबर तें पू बापूजींना पाठवून दिलें होतें. त्याना वेळ होताच ते वाचतील कदाचित् यंग इंडियांत लिहितीलहि मीहि त्यांना माझा संतोष कळविलाच आहे तुमची तार निरर्थक होती तुमच्या पूर्वीच्या अेका पत्रात तुम्ही टाअिम्सचें कटिंग पाठवलें होतें आणि तडजोडीच्या कलमाविषयीं अभिप्राय विचारला होता तें पत्र आणि त्यांतील कटिंग मी कोठें ठेवलें कोण जाणे! कटिंग तर वाचलेंच नव्हतें त्यामुळें अुत्तर पाठविता आलें नाहीं दिलेल्या वचनाला चिकटून राहावें अशी तुम्ही रयतेला सल्ला देत आहात हें अुत्तम आहे थोडेसे अप्रिय व्हाल, पण जबाबदार पुढारी व्हाल लोकाना स्वराज्याच्या यात्रेला नेण्यात जो पुढाकार घेतो त्याची पाठच लोकांकडे असणार आणि छाती शत्रूच्या गोळ्यांकडे असणार असें असलें तरच लोक

त्याच्या मागून येतील लोकप्रियतेच्या नादीं लागून लोकाकडे तोंड केलें तर आशुकमाशुकाप्रमाणें परस्पर रंजन करता येईल पण त्यानें स्वराज्यप्राप्ति होणार नाहीं व लोकहि शेवटीं कंटाळून विमुख होतील

पण प्रजापक्ष व सरकार यामधील करारासंबंधानें शंका रहात असली तर त्याचा फायदा प्रजेलाच मिळाला पाहिजे असा न्याय आहे कारण कायदे-शास्त्रापेक्षा श्रेष्ठ असें धर्मशास्त्र (Equity) म्हणतें कीं, दोन पक्षामध्यें समेट झाला असता समेटाच्या कलमाचा अर्थ दुर्बळ पक्षाला अनुकूल असाच केला पाहिजे

यापुढें तुम्हाला दुसरें काम केलें पाहिजे तुम्ही रयतेला सागा कीं 'राजा कालस्य कारणम्' हे दिवस आता गेले 'यथा राजा तथा प्रजा' असें म्हणण्यापेक्षा 'यथा प्रजा तथा राजा' ही म्हण आता खरी केली पाहिजे राजा वचनाला जागला नाहीं म्हणून रयतेनें सत्याग्रह केला, आणि प्रजेनें अब्रू मिळविली समेटामध्यें प्रजेच्या पुढाऱ्याची चूक झाली तरी पुढाऱ्या-मार्फत दिलेल्या वचनाला जागून राजाला लाजविलें पाहिजे व जागविलें पाहिजे, याच बरोबर तुम्ही राजाला उद्देशून जाहीर करा कीं "राजा, प्रजेच्या भोळ्या प्रतिनिधींनीं वचन दिलें त्याचा कीस काढून आपली तुमडी भरण्याचा अदूरदर्शी स्वार्थ करू नको या वेळीं उदारता दाखविशील अथवा तुझ्या कायद्याचीं कलमें पाळशील तर प्रजेला लायख असा राजा होशील नाहींतर प्रजेसमोर तू फिका पडशील आज प्रजा दिलेलें वचन पाळील, पण प्रजेंत संतोष रहाणार नाहीं प्रजेचा संतोष हेंच तुझें खरें भाडवल प्रजा बलवान् झाली तर तिला राजानें भिण्याचें कारण नाहीं प्रजेमध्यें शक्ती-बरोबर घरंदाजपणा येत आहे हें तुला दिसलें पाहिजे प्रजा जागृत झाली आहे. वयात आलेल्या मुलाला बाप जसा मानानें वागवतो आणि प्रत्येक कामात त्याची सल्ला घेतो, त्याप्रमाणें तूहि आता प्रजेच्या बाबतींत वर्तन ठेवलें पाहिजे राजा म्हणजे काहीं 'वीस सवे तीस' करून प्रजेला नाडणारा 'सावकार' नव्हे राजा म्हणजे प्रजासेवक "

मुद्याची गोष्ट मी थोडक्यात वर माडली आहे तिकडील परिस्थिती-प्रमाणें तुमच्या मनात येईल त्याप्रमाणें, तुमच्याच भाषेत सर्व माडाल

मला वाटतें, व्यक्तिगत तक्रारींचें काम करून झालें पाहिजे. लोकाना म्हणावें, तुम्ही आतापर्यंत जो जोर दाखविला तसाच पुढें दाखवाल, तर व्यक्तिगत तक्रारींत देखील न्याय मिळालाच पाहिजे. न्याय मागताना आपली बाजू सत्याची आणि हात निर्मळ असावेत. मागणी अत्यंत नेमस्त, हक्काहून थोडी कमीच असावी. अितकें केल्यानंतर मागितलेलें घेतल्यावाचून अुठूच नये निशाद् काय सरकारची कीं न्याय देणार नाहीं? लोकाना आजवर हार खाण्याची सवय लागली आहे, ती मोडली पाहिजे अेक वाक्य ध्यानात ठेवण्यासारखें आहे 'I would rather break than bend'

व्यक्तिगत तक्रारींचें काम पुरें झाल्यानंतर अथवा चालू असतानाच प्रजाकीय संघटना करण्याच्या कामाला लागलें पाहिजे जबाबदार रीतीनें देशाची परिस्थिति समजावून सांगितली पाहिजे खेडा जिल्ह्यातील सत्याग्रह, चंपारण्याचा सत्याग्रह, बोरसदची चळवळ, बारडोलीचा सत्याग्रह, वगैरे आधुनिक प्रजा-धर्म ग्रंथ वाचून दाखविले पाहिजेत नेमस्त लोकाप्रमाणें Government of India Act, Morley-Minto Reforms, Montford Reforms, वगैरे सनदशीर चळवळींची माहिती देत बसण्यात अर्थ नाहीं नेभळें राजकारण प्रजेच्या कानावरहि पडता कामा नये तुम्ही मंडळींना मात्र त्या सर्व गोष्टींची चांगली माहिती असली पाहिजे, पण ती यथाकाळीं मिळेलच

*ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद ब्राह्मणानीं अुदारपणें पड खाअून मोडला पाहिजे हें तुम्हाला अुत्तम पटलें आहे असें दिसतें*

आता कामावाचून राहू नका प्रकृतीला सभाळून सतत अुद्योगातच रहा खेडोपाडीं जाअून आरोग्यवर्धक योजना अमलात आणा मलमूत्रावर माती घालणें, विहिरी साफ ठेवणें, कपडे वारंवार धुणें, अथरुणें वगैरे वाळत घालणें, घराचीं कवलें काढून आत अुन घेणें, पिण्याचें पाणी स्वच्छ ठेवणें, होतां होअील तों शिळें न खाणें, लहानपणीं लग्नें न करणें, दारू न पिणें, अुधळपट्टी न करणें, आळशी आयतोबांना दान न करणें, लाच न देणें, वगैरे बाबतींत लोकांना जागृत करा लहान मुलांचें मरण-प्रमाण कमी झालेंच पाहिजे, याविषयीं चळवळ करा जातीजातीमधील अुच्चनीच भाव

आणि 'वरिष्ठां'ची आढ्यता दूर करण्याविषयीं वारवार बोला खाण्या पिण्याचे व्यवहार शुद्ध, पवित्र पण सोपे केले पाहिजेत याविषयीं खाजगी चर्चा करा या सर्व मार्गानीं कदाचित् तुमची लोकप्रियता कमी होईल, पण जुलमाविरुद्ध चळवळीचा दुसरा हगाम येईल, तेव्हा तुमच्या लोकप्रियतेस पुन्हा भरती येईल तुमच्या आसपास आळशी गप्पीदासाना गोळा होऊं देऊं नका

काकाचा शुभाशीर्व

---

# ४२

ॐ                                                                 विद्यापाठ
अहमदाबाद
१ १ २८ रवि

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें पत्र पोहोंचलं तुम्ही कर्जमुक्त झालात, याचें अत्यंत समाधान वाटलें यापुढें कधींहि कर्जांत न सापडण्याची खबरदारी घ्यालच या कामात पू बापूजींकडून धडा घेण्यासारखा आहे आजपर्यंत त्यांनी जेवढीं कामें केलीं त्या सर्वांत प्रथम फड जमा केला व प्रत्येकात जमेपेक्षा खर्च कमी

आजच्या नवजीवनमध्ये 'सुंदर सत्याग्रह' म्हणून ना कॉलमचा लेख आहे त्यांत तुमचं पत्र आहे सत्य, शांति, दृढता, हिंमत, सादाई, वित्यादि गुणांबद्दल तुमची तारीफ आहे मला तुमचा अितका हेवा वाटतो कीं पुसू नका मीं तुमचं हिंदी पत्र त्यांना दिलें व तुमच्याविषयीं मला वाटत होतें तें त्याना सांगितलं, पण यंग अिंडियात काहींच आलें नाहीं तेव्हा मी काहींसा खिन्न झालों होतों आजचा लेख वाचून आनंद झाला

तुम्ही 'त्यागभूमि'साठीं सविस्तर लिहिल्यास हरकत नाहीं त्या लोकानाच परभारें लिहून विचारा त्या लोकाचेजवळ माझी प्रतिष्ठा पूर्वी अितकी राहिली नाहीं वैजनाथच्या अेका पुस्तकावर मीं अजून अभिप्राय लिहून दिला नाहीं म्हणून तो खपा आहे

न लोकः पारमार्थिकः । अथवा तुमच्या हिंदीची म्हण आठवायाची म्हणजे 'यह ससार मतलब का लोभी झूठा ठाठ रच्यो ' मात्र माझी अिच्छा आहे कीं तुम्ही मिरज सत्याग्रहाची सायत हकीकत मराठींतच लिहून मजकडे पाठवून या मजसाठींच लिहावयाचें आहे, तेव्हा स्वत च्या पराक्रमाचीहि मुक्तकंठें स्तुति करावयास कचरू नका आपला सबध जसा आहे तसाच राहिला पाहिजे त्यांतून मला हवें तें मी घेअीन

या पुढचा तुमचा कार्यक्रम मला कळवा तुम्ही येथें येणार होता ना? त्याचें काय केलें?

काका

---

# ४३

ॐ

गुजरात विद्यापीठ,

अहमदाबाद

चैत्र कृ १२ सोम

९-५-२९

प्रिय पुडलीक,

तुमच पत्र पोहोंचल्याला बरेच दिवस झाले माझ्या शेनवच्या पत्राचें तुम्हाला विचित्र वाटलें असेल पण तुम्ही हुबलीला पोहोचला असाल अशा समजुतीनें व तेथील पत्त्यावरच पाठविण्यासाठीं लिहिलें होतें पण तुम्ही हुबलीला गेला नाहीत आणि चंद्रशखरनें पत्रालाहि तेथें जाअू दिलें नाहीं न नाहक तुम्ही कष्टी झालात अेवढें खरें आहे की गैरसमज करून घेण्याअितके—तुम्हीहि नाही आणि मीहि नाहीं म्हणूनच तातडतीने अुत्तर

पाठविण्याची घाअी केली नाहीं पण बाबासाहेबाच्या पत्रावरून समजतें कीं तुम्ही मिरजेस आजारी आहात याला काय म्हणावें ? तुम्हाला आता आजारी पडण्याचा हक्कच कोठून राहिला ? अहो, मी देखील आजारी पडत नाहीं तुम्हाला तें काय म्हणून सुचावें ? आता लवकर बरे व्हा, आणि त्याप्रमाणें मला कळवा पू गगाधरराव मुबअीपर्यंत आलेले दिसतात पण अेक रात्र खर्च करून येथें यावयाचें त्याना सुचावयाचें नाहीं पण असा लोभ मीं काय म्हणून करावा ? २४ तास ते कामातच असतात मींहि त्याचें अनुकरण केलें पाहिजे

चि बाळ मध्यतरीं आजारी होता आतां बरा आहे चार दिवस मजजवळ राहण्यास आला आहे सध्या येथें सुट्टी सुरू झाली आहे अून कसें स्वच्छ, निर्मळ आणि मनापासून पडत आहे ! भट्टीवाचूनच बिस्किटें तयार करण्या जोगें अून आहे मी अुन्हाळ्यात कोठेंहि जाणार नाहीं नरहरीभाअी काहीं विद्यार्थ्यांना घेअून पधरा दिवसासाठीं बारडोलीला जाणार आहेत माझी प्रकृति अुत्तम आहे तुमची अुत्तम असल्याचें पत्र लवकर येअू द्या अगदींच चिंता न करण्याअितका पूर्ण गीताभ्यासी मी अजून झालों नाहीं

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

# ४४

ॐ                                                   आश्रम

आश्विन शु ७, रवि

प्रिय पुटलीकजी,

परवा म्हणजे ३ तारखेला सध्याकाळीं पू बापूजींना भेटलों होतों त्याची प्रसन्नता पाहून विस्मय वाटतो शरीराची कातडी अेखाद्या लहान मुला-प्रमाणें निर्मळ व पारदर्शक झाली आहे अस्थिपंजरात प्राण राहाण्या अितकीच शक्ति बाकी आहे अितकें असूनहि रोजचा अर्धा तास चरखा

चालत असतो. अेवढी अलौकिक स्वराज्य-अुपासना आजवर कोणीहि केली नाहीं. याअुपर जे सूत कांतणार नाहींत त्यांना कलियुगाचे अनन्य अुपासक म्हटलें पाहिजे.

आपला

काका कालेलकर

## ४५

ॐ

मंगलोर,

श्रावण व. ११, मंगळ.

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें ता. २० चें कार्ड पोहोचलें. तुमचें हें कार्ड मी गंगाधररावांना आज दाखविलें. तुम्हांला वाटतें, गंगाधरराव तुमच्याविषयीं विरक्त झाले आहेत व त्यांना तुम्हांला काय हवें आहे, तुमचा विचार काय आहे, वगैरे कांहीं समजत नाहीं. माझ्या मतें मला दोघांविषयीं सहानुभूति वाटून दुप्पट वाअीट वाटतें. तुम्ही हुदलींत नसाल, तेव्हां मिरजेच्या अंबाबाअी व्यायाम-मंदिराच्या सेवेंतच सर्व शक्ति खर्च करावी. (तालीम संस्था असलें धेडगुजरी नांव बदलण्यापासून सेवेची सुरवात करा.) साहित्यसेवेचा तुम्हांला कितीहि मोह असला, तरी त्या क्षेत्रांत प्रथम पंक्तीचें काम तुमच्या हातून होणें नाहीं; अुलट समाजसेवेंत अप्रतिम काम करून दाखविण्याची तुमची शक्ति आहे. तुम्ही स्वतांला ओळखाल, त्या दिवशींच तुमचा अुद्धार होणार आहे. तुम्ही यापुढें अेखाद्या नवीन संस्थेंत जाणें याचा अर्थच मला समजत नाहीं. हिंदी प्रचार, आखाडाप्रचार, अस्पृश्यांची सेवा, वगैरे कितीतरी कामें तुमच्या हातून होण्यासारखीं आहेत. मला भीति वाटते कीं आत्मविश्वास गमावून तुम्ही श्रिस्रेंश्रिस अुतरत चाललां आहांत. माझी ही समजूत चुकीची असेल तर तुमचेपेक्षां मलाच अधिक बरें वाटेल, म्हणूनच मी क्षमा मागत नाहीं. अेक, दोन किंवा तीन महिन्यांत मी परत खानेंर्ने येअीन.

आपण भेटल्यावर तुमच्या कार्याची दिशा नक्की करू. तोंवर धीर धराल अशी आशा आहे. मी बापूजींचेबरोबर फिरत राहणार आहे. त्यांचा पत्ता तो माझा पत्ता.

काका

## ४६

ॐ

अहमदाबाद,
चैत्र शुक्ल ४, ८१.

प्रिय पुंटलीक,

पुराणिक किंवा हरदास यांचे संस्कार जर बलवत्तर असले तर, अनुकूल असोत किंवा प्रतिकूल असोत, तुमच्यानें ते कसे टाळले जाणार! तेंहि धंदे समाजसेवेचेच आहेत मात्र ते अत्यंत पवित्र धंदे अनधिकारी लोकांनीं बिघडवून टाकले आहेत. ते शुद्ध करून त्यांना आधुनिक व्यापक धर्माचें वळण घ्यावयाचें आहे लोकांपुढें शुद्ध विचार जरूर मांडा; पण नवीन नवीन योजना किंवा सामाजिक व्यवस्थेंत ढवळाढवळ करण्यापूर्वी दूरवर दृष्टि पोहोचवा. ख्रिस्ती लोकांना हिंदु करून घेण्यात समाजहितच होत आहे, अशी माझी खात्री नाहीं. गंगाधरराव‌हि या कार्यांत खेंचले गेले म्हणावयाचे! हिंदुसमाजातल्या वरच्या वर्गांची शुद्धि करणें आवश्यक आहे. खेड्यापाड्यांतील गांजलेल्या लोकांचें खादीद्वारें संगठन करणें आवश्यक आहे. आणि अस्पृश्यतानिवारण करून हिंदुधर्माला वांचविणें अत्यंत आवश्यक आहे हें विविध हिंदुकार्य सोडून हिंदुधर्माला त्याचें नाव कायम ठेवून, आतून बाटविण्याचा प्रकार चाललेला पाहून मागेमागच्यान्ला वाईट वाटणें स्वाभाविक आहे

'मनुस्मृति' हा एक प्राचीन आदरणीय ग्रंथ या दृष्टीनें वाचा. हिंदुसमाजाची ओका काळची सर्वमान्य समाजव्यवस्था त्या ग्रंथांत नमूद आहे. आज तो ग्रंथ प्रमाण म्हणून घेतां यावयाचा नाहीं मनुस्मृतींत आंखलेली समाजव्यवस्था चालविणें आज शक्य नाहीं, व अिष्टहि नाहीं.

आजकाल मी बराच कामांत असतों. व पूर्वी जसे चंद्रशंकर २४ तास मजबरोबर असत तसे आतां असूं शकत नाहीत. व जवळ असतात तेवढ्या वेळाचाहि मी अुपयोग करूं शकत नाहीं. त्यामुळें गीतेच्या श्लोकांवर विस्तृतपणें लिहिणें मनांत असूनहि शक्य नाहीं.

अुलट तुम्हांलाच थोडासा त्रास देअूं का ? माझ्या पसंतीच्या श्लोकांवर यथार्थदीपिका काय म्हणते, भावार्थदीपिका काय म्हणते, आणि आचार्य काय म्हणतात, हें अगदीं थोडक्यांत मुद्यांचा विपर्यास न करतां मला लिहून पाठवाल का ? या प्रयत्नांत तुमचें वाचन बारकाअीनें होअील व थोडें मननहि वाढेल. अेवंच तुमचा लाभ त्यांत.आहे. देवासुरसंग्रामाचें टिप्पण सांपडेल तेव्हां पाठवून देअीन.

पू. बापूजी युरोपला जाण्याचा विचार करीत आहेत. अजून नक्की ठरलें नाहीं.

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

---

## ४७

अथ गीताहृद्गतम् !

गीताध्यान रचणाऱ्याच्या दृष्टीनें गीतेचें रहस्य काय आहे ?

ज्ञानमुद्र जगद्गुरु श्रीकृष्णानें सर्व अुपनिषदांचें दोहन करून ज्ञानमय प्रदीप अशा भारतामध्यें भगवद्द्वेषिणी, अद्वैतामृतवर्षिणी अशी गीता लिहिली. भारतपंकजाचा अुत्कट गंध तोच गीतार्थ. आणि तो कलिमलप्रध्वंसी आहे.

वरील वर्णनावरून गीता-महात्म्यकाराच्या दृष्टीनें गीता परमार्थबोधक असून मोक्षपरायण, ज्ञानमार्गानें अद्वैतसिद्धि प्राप्त करून देणारी आहे, असें दिसतें.

१ ला अध्याय आणि २ऱ्या अध्यायाचा आरंभ म्हणजे गीतारूपी संगीताचा तानपुरा आहे. ज्या वृत्तीला अर्जुन धर्मभीरुता समजतो, त्यालाच श्रीभगवान् हृदयदौर्बल्य म्हणून धिकारतात. ही अनार्य वृत्ति आहे असें ठरवून, असलें क्लैब्य टाकून दिलें पाहिजे, असा आग्रह करतात. पुढें अर्जुनाला देखील वाटतें कीं, आपण कार्पण्यदोषानें घेरलेले आहोंत व धर्मसंमूढचेता झालेले आहोंत.

धर्मनिर्णय करतांना मनुष्याला वाटतें कीं, आपल्यामध्यें बुद्धिदौर्बल्य आहे. पण खरोखर असतें हृदयदौर्बल्य. जो निर्विकारी, निर्भय आणि भगवत्परायण आहे, त्याची बुद्धि निर्मळ असणारच. बुद्धियोग हा अीश्वराची देणगी आहे. हृदयशुद्धि ही मनुष्याची लायकी आहे.

मनुष्याच्या हृदयांत शक्ति आणि अशक्ति दोन्हींचा वास आहे. सत्, असत्, दोन्ही मिळून मनुष्य झालेला असतो. त्यापैकीं सत् म्हणजेच अंतरात्मा, परमात्मा, श्रीभगवान् त्याला प्रपत्तिपूर्वक विनविलें म्हणजे यत् श्रेयः असेल तें प्राप्त होतें.

संध्येमध्यें अघमर्षण मंत्र आहे. त्यांत पाप किंवा प्रायश्चित्त यांचें नांवहि नाहीं. फक्त सृष्टीचें सनातनत्व आणि विस्तृतत्व यांचें वर्णन करून पापाला अभिभूत करणारी अशी अुदात्त वृत्ति तेथें अुत्पन्न केली आहे. अघमर्षणाचा याच्याहून श्रेष्ठ अुपाय कोणता ? गीतेमध्यें भगवंतहि अघमर्षण ऋषीप्रमाणें मानसशास्त्रवेत्ते असल्यानें त्यांनीं अर्जुनाचा प्रश्न बाजूस ठेवून आपल्या संगीताचा सूरच आत्मस्तोत्राच्या गांभीर्यानें सुरू केला आहे. दुसरा अध्याय म्हणजे आत्मवैभवदीप आत्म्याच्या स्वरूपाविषयीं इतके अुत्साहयुक्त अुद्गार जगाच्या साहित्यांत अन्यत्र नसतील. अेखादा सॉक्रेटीस अथवा सुधी वत्स पार्थच असला ग्वाअू गाअून पचवू शकेल.

काका

४८

ॐ

विद्यापीठ,
अहमदाबाद
आषाढ शु. १३, शुक्र.

प्रिय पुंडलीकजी,

माझें शेवटचें पत्र मिळालें असेलच. दुःखित अंतःकरणानें आज तुम्हाला लिहितों कीं, माझ्या कसोटीला तुम्ही नापास झालां आहांत. कर्जाला भ्यावें वाण्यानें. ब्राह्मणाची मुख्य दीक्षा निःस्पृहता आणि भिक्षा हीच आहे. अेडमंड बर्कला थोडेंथोडकें कर्ज नव्हतें. ब्राह्मण आणि क्षत्रिय कर्ज करील तर तो मूर्ख, त्याला कर्ज देअील तोहि मूर्ख ! राष्ट्राचें बोलावणें यावें, आणि तुम्हीं अुत्तर पाठवावें कीं, खासगी कामामुळें येतां येत नाहीं. याहून दुसरा अधःपात कोणता ? अेक दोनदां जावयाची नसते. अजूनहि जागा आणि बाबासाहेबांना म्हणा 'अहो बत महत्पापं...' जसे असाल तसें, व्यवहार कुजत टाकूनहि, राष्ट्रकार्याला धांवा. नाहींतर मला लाजेनें मेलें पाहिजे.

काका

४९

ॐ

विद्यापीठ,
अहमदाबाद
भाद्रपद शु. १०, गुरु.

प्रिय पुंडलीकजी,

खानगी संभाषण या वार्तालाप करना लेकिन जाहिर व्याख्यान नहीं देना, यह नीति मुझे बहुत पसंद आअी है। अिस से अच्छा काम होगा। जब वातावरण परिपक्व होगा तब व्याख्यान का समय आ जायगा।

आज के Young India में बापूजी ने अस्पृश्यतानिवारण के बारे में लेख लिखा है, और शास्त्राधार का अेक श्लोक देकर उस की चर्चा भी की है। मेरा ख्याल यह है की शास्त्र के श्लोक मंदिरप्रवेश के वास्ते अनुकूल हो सो प्रगट करने चाहिये, लेकिन् अुनके आधारपर तकरीर नहीं करनी चाहिअे। शास्त्रप्रामाण्य के झगडे में कभी भी अुतरना नहीं चाहिअे। वकील, शास्त्री और मुल्लाओं का वह क्षेत्र है। शास्त्रप्रामाण्य का आप इनकार भी न करें, पुरस्कार भी न करें। आपकी मनोवृत्ति शास्त्रप्रामाण्य के विरुद्ध नहीं है, लेकिन् अुदासीन है यह मैं जानता हूं, इसलिये मैं ने बताया है वही सत्य का मार्ग है।

नारायणशास्त्री जरूर कुछ मदद करेंगे। लेकिन् वे कभी अग्रस्थान नहीं लेंगे। बहुत कुछ काम होगा तब वे दो चार कदम आगे आयेंगे। जो नीति विजापुरकर के समर्थ विद्यालय की थी वही आज प्राज्ञपाठशाला की दीख पडती है। यह तो वंशपरंपरा ही गिनी जायगी।

श्री विनोबा को आपने खत लिखा ही होगा। विनोबाका कुछ मदिर होता तो वे आजतक चूपचाप नहीं बैठे होते।

अेक दफे अुत्सव-समारंभ करके अस्पृश्यों को मंदिरों में ले जाँय अितना बस नहीं है। रुढिग्रस्त लोग गायके मलमूत्रसे मंदिर को भी प्रायश्चित्त देंगे, और फिर जैसे थे वैसे हो जायेंगे। अिसलिये जहा मंदिर खुला वहापर हर अेकादशी को अस्पृश्यसमेत सब हिंदुओंका कीर्तन रखना चाहिअे। कमसे कम अेक स्थानिक आदमी मिल जाय तो काम बराबर होगा। और जितने मंदिर खुल गये अितनी जगासे मासिक निवेदन तो आपको और जमनालालजी को मिलना ही चाहिअे। आगे देश जीतते गये और पीछेसे जिता हुआ मुल्क खोते गये अैसा नहीं होना चाहिअे। अेक अेक मंदिर अस्पृश्यता-निवारक छावणी बन जाय अितनी तैयारी चाहिअे।

अब आप के तात्त्विक सवाल। 'अस्पृश्यों में मंदिरप्रवेश की अुत्कट अिच्छा नहीं है, तब सोते हुअे को बाहर क्यों जगाते हो और नया झगडा पैदा करते हो?' अैसा सवाल पुछनेवाले बहुत है। आपने अुस का अुत्तर दिया है सो समर्पक है। हमें अन्याय से कभी भी लाभ नहीं अुठाना चाहिअे। धर्मत

जिसका जो हक है सो उसे मिलना ही चाहिअे। अंत्यज लोग सोते होंगे, लेकिन् ओश्वर तो सोता नहीं है। अस्पृश्यों को दूर रखने में ओश्वर दुःखी और अपमानित होता है। और धार्मिकता का खून होता है। न्यायमूर्ति चंदावरकर ने रास्तही कहा था की अस्पृश्यता-निवारण में हम अंत्यजों का नहीं हमाराही अुद्धार करते हैं। अस्पृश्यता-निवारण परोपकार का आंदोलन नहीं है, आत्मशुद्धि का है। इसलिये हरएक हिंदू को चाहिअे की 'अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्' कहकर वह चिल्लाता अुठे, और कपडे में घुसे हुअे नागिन के माफक अस्पृश्यता को फेंक देवे।

व्यवहार भी यही कहता है। हिंदुस्थान में अब ब्राह्मणराज्य रहा नहीं है। अस्पृश्यों को भ्रातृभावसे अगर तुम नहीं जगाओगे तो दूसरे लोग जगाएंगे, मुसलमान जगाएंगे, ओसाओी जगाएंगे, आधुनिक शिक्षा जगायगी, दुनियाभर की क्रांति जगायगी, हृदयस्थ नारायण उन को जगाअेगा। बुढिया अपने मुरगे को टोपली के नीचे बंद रखकर क्या अरुणोदय को रोक सकती है? अगर हम लोग भाओी के प्रेम से और अन्याय के पश्चात्ताप से अंत्यजों को जगाएंगे तो वे हमारे कायम के मित्र रहेंगे, भाओी रहेंगे। हम अैसा नहीं करेंगे तो भी वे जागेंगे तो सही, लेकिन् शत्रु होकर जागेंगे। और हमेश हमारा तिरस्कार करेंगे। और वर्षोंतक राष्ट्रिय प्रगती के विरोधी बन जायेंगे। धर्म और न्याय समझकर के किसी चीज को मान लेना यह अच्छा है? या मार खाकर हारकर जबरन मान जाना अच्छा है? महाराष्ट्रीयों की माकन में शायद लिखा है– तत्तत् कर्म कृतं यदेव मुनिभिः तैस्तैः फलैर्वंचिताः।

हीन स्वार्थ भी ब्राह्मणों को और पूजारीओं को कहता है–अजी देखो, लोगों में मंदिरपर का विश्वास ही कम हो रहा है। पहले के जैसे लोग मंदिर में आते ही नहीं हैं। आमदनी घर गओी है। लिखे पढे हुअे लोग तो व्याख्यानके वास्ते ही मंदिर का टाऊन हॉल के माफिक अुपयोग करते हैं। पूजाअर्चा में अुन को बिलकुल रुचि रही नहीं है। जो कुछ भोलाभाव और दानवृत्ति रही है सो अनपढ और लालची पछान लोगों में ही। अुन्हीं के पास से चार पैसे मिलने का संभव है। और वह भी जबतक शिक्षा ने अुन के भीतर प्रवेश

नहीं किया है तबतक। अब मंदिरों की आमदनी कुछ रखनी हो तो तो अब्राह्मणों को राजी रक्खो और अंत्यजों को मंदिरों में आने दो। सो पचास बरस तक तो तुम्हारा अच्छी तरह चलेगा। आगे का दु ख देखा जायगा।

न्यायअन्याय की परवा नहीं रखनेवाले धूर्त लोग भी कहते हैं – हम जबरदस्तों से डरकर चलनेवाले हैं। ब्राह्मण लोग बलवान थे तबतक हम अुन से डरे। अब हमें देख लिया है की सामाजिक शक्ति विशेषरूप से प्रगट हो रही है पिछड़ी हुआ जाति के लोगों में। अब अुन को राजी रखना यही हमारा काम है। हम अभी अस्पृश्यों के मंदिर के बाहर नहीं रखेंगे। अुस में हमारा स्वार्थ नहीं है।

इस तरह से अंत्यजों का मंदिरप्रवेश यों सब तरफ़ी से युगधर्म बन चुका है। आज अितनाही लिख सका हू। बाकीका फिर।

काका

---

५०

ॐ

गुजरात विद्यापीठ
अहमदाबाद
श्रावण कृ ३०, मंगळ

प्रिय पुटलीकजी,

तुमचीं दोन्ही कार्डे मिळालीं 'स तु भवति दरिद्रो यस्य तृष्णा विशाला' तुम्ही जर खरोखर अकिंचन झाला असाल,तर तो विश्वजित् यज्ञच म्हटला पाहिजे जर आता तुमच्या मनातून सज्जन, पापी, मित्र, शत्रु, कोणाहि सबधानें रागद्वेष राहिला असेल तर तो काढून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे कधीं तरी म्हणाला कीं नाहीं, 'अभय सर्व भूतेभ्यो, मत्त सर्व प्रवर्तते'?

असो अकिंचन होण्याचा तुम्ही मोठा थाट करणार असें दिसतें हें सर्व *प्रेमळपणानें व्हावें, मानीपणानें होअू नये, अेवढा अकुश मिळमळ्यांवर* ठेवालच

वडिलार्जित शेतें विकतांना अत्यंत वाअीट वाटलें, हें स्वाभाविक आहे. कौटुंबिक जीवनाची ही अंत्येष्टि होती. आतां तुम्ही द्विज झालां असें म्हणतां येअील. 'मत्ता' शून्य झाली म्हणजे सत्ता अनंत होते' असें गणित आहे. पण त्याला मत्ता हृदयांतून निघाली पाहिजे. आज ती स्थिति नाहीं, हें कबूल केलें पाहिजे. यापुढें सूक्ष्म रीतीनें देखील अुसनवार किंवा कर्जाचा चिपळ लावून घेअूं नका, असें पुन्हां सांगितल्यास त्याचें वाअीट वाटून घेअूं नका. सतीचें जसें शील, त्याचप्रमाणें तुमचें अकिंचनत्व. धन किंवा ऋणसंपत्ति तुमच्याजवळ नसावी.

अेकदां नापास झालें तरी पुन्हां पास होतां येतें. कळावें, लोभमुक्ति असावी, हे विनंति.

काका

---

# ५१

ॐ गुजरात विद्यापीठ

अहमदाबाद

श्रावण व. ३०, मंगळ.

श्री. पुंडलीकजी यांच्या मित्रमंडळास सप्रेम न. वि. वि.

पुंडलीकजींचा व माझा परिचय पुष्कळ वर्षांचा आहे. पुंडलीकजींची देशभक्ति, सेवावृत्ति, मित्रनिष्ठा आणि अंतर्बाह्य मोकळेपणा, यांचा परिचय जसा मला आहे, तसा आपल्यालाहि आहेच. मित्रांच्या आग्रहाला वश होणें, वागिकसारीक बाबतींत जीवनतत्त्वें बाजूला ठेवून तात्पुरती सोय पाहणें, आणि त्यायोगें विचारांत थोडासा घोटाळा असणें, हे चालू पिढीचे सार्वत्रिक दोष आहेत. तसे दोष जर आपण आपल्या स्नेहीमंडळींत पाहिले तर त्यांना अुत्तेजन न देतां तत्त्वनिष्ठेची दृढता अथवा कर्कशता वाढविण्यांत मित्रांना मदत करणें, आपलें सर्वांचें कर्तव्य आहे.

पुंडलीक आपणात मिळूनमिसळून वागतात, आपलीच भाषा बोलतात, अेवढ्यावरून त्यांना व्यवहारातील माणूस समजण्याची चूक करता कामा नये पुंडलीक ब्रह्मचारी आहेत त्याना आजन्म ब्रह्मचारी राहावयाचें आहे त्यानीं देशसेवेचें व्रत घेतलें आहे त्याना खाजगी जीवन नाहीं खाजगी मालमत्ता, स्वत.चे असे नातेवाअीक, जीव रजविण्याच्या हौशी, प्रतिष्ठेचा लोभ, अित्यादि काहीं त्याना नसावें हें सर्व अीश्वरनिष्ठेवाचून होणें किंवा टिकणें शक्य नाहीं व्यवहारी लोकामध्यें अीश्वराची भक्ति असेल, पण अीश्वरावर निष्ठा नसते पडक्या पैसे, अिस्टेटीचा लोभ, आणि स्वत ची धूर्तबुद्धि या गोष्टींवरच ससारी लोक विश्वास ठेवतात, आणि अुद्याची काळजी आज करून अेकदा मरण्याच्या अैवजीं रोज मरत राहतात. पुडलीकसारख्यानीं वरील वृत्तीला अपवाद म्हणून समाजात वावरलें पाहिजे बेफिकीर फकिरी वृत्तीनें राहण्याच्या त्याच्या सकल्पाला मित्रमडळींनीं मदतच केली पाहिजे पुढें जाणाऱ्याचे पाय प्रेमानें देखील मागें ओढण्याचें पाप आपल्या हातून न व्हावें प्रसग पडला असता आधारास चार रुपये आपलेजवळ पडले असलेले बरे, या प्रकारचें व्यवहारशास्त्र गृहस्थाश्रमाला देखील शोभू नये जगातील असख्य गृहस्थाश्रमी मजूर अुद्याची काळजी न करता आयुष्य सुखानें कठतात, रोजची आजीविका रोज मिळवितात अगभर काम करतात, पोटभर खातात, आणि डोळाभर निजतात ही स्थिति देवाच्या राज्यात शापरूप नसेल तर पैशाच्या अुबेवर जगणाऱ्या असख्य लोकाना अुपाशी मारून धनसग्रह करणाऱ्या, आणि अशा सग्रहद्वारा स्वतःच्या सततीस अधिकाधिक प्रजाद्रोही, नास्तिक आणि नामर्द बनविणाऱ्या मध्यम वर्गाचें आणि श्रीमत वर्गाचें जीवन अवश्यमेव शापरूप असलें पाहिजे या शापातून पुडलीकसारखा अेखादा जीव मुक्त होअू पहात असेल, तर मित्रमडळींनीं त्याची दया न खाता त्याचें अभिनदन केलें पाहिजे अनाथ विधवा ज्याप्रमाणें हजारपाचशेंच्या पुजीवर जीव ठेवून असते, त्याप्रमाणें पुडलीकचें न व्हावें

आजवर पुडलीक ससारी होते. नातेवाअिकाचा त्याना पक्षपात होता, कुटुबाचा अभिमान होता, वडिलार्जित अिस्टेटीचा मोह होता कर्जाची लाज

डोक्यावर होती या बाबाजींच्या मार्गानें या सर्वांतून आज ते मुक्त झाले आहेत हातीं आलेले पैसे कर्जफेडीकडे वापरून ते स्वत आता निर्मळ होणार आहेत, आणि भगवंताची गीता जसें सांगेल तसें करणार आहेत ती जेथें नेईल तेथें जाणार आहेत त्यांची काळजी करून आपल्यापैकीं कोणीहि त्यांचा अपमान करूं नये त्यांचे नावें त्यांच्या संमतीनें किंवा त्यांना न कळत कोणी अेक पै देखील ठेवता कामा नये कष्ट सोसण्यानें त्यांचें शरीर काहीं सहा वितीं होणार नाहीं, आणि सुखात राहण्यानें काहीं ते आठ वितीं होणार नाहीत जगात आपणच त्यांचे मित्र आहोंत, आपल्यालाच त्यांची कदर आहे, अन्यत्र त्यांचे हाल होतील, असा क्षुद्र अहंकार आपल्यात नसावा आणि कालअपेक्षांनीं पुंडलीकसारखें कोमल फूल कोमेजून जाअील अशी भीति बाळगणें, हेंहि त्यांच्यावर अन्याय करण्यासारखें आहे पुंडलीकाच्याहून आपण अधिक सुखात रहात आहोंत याचें कोणास वैषम्य वाटत असेल तर त्यांनीं स्वत.चीं चैन कमी करावी, होअील तेवढें पुंडलीकजींच्या सद्गुणांचें अनुकरण करावें, त्यांचे दोष गाळावेत, आणि त्यांना चैनीकडे किंवा दुनियादारीकडे खेचू नये

जोंपर्यंत पुंडलीकानीं काहीं स्थिर काम हातीं घेतलें नाहीं, तोंपर्यंत चंचल वृत्तीने ते अनेक ठिकाणीं फिरतील, अनेक मित्रांच्या घरीं अतिथि होअून राहतील, प्रवासासाठीं पैसे मागतील, पुस्तकाचा लोभ अजून राहिला असेल तर पुस्तकें मागतील, अडचणींत सापडलेल्या अेखाद्याला मदत करण्यासाठीं पैसे मागतील अशा वेळीं आपण आपला मित्रधर्म विसरता कामा नये जो स्वत वैराग्यपूर्वक अकिंचन झाला आणि जो धर्मानें वागत आहे, त्याचा जमातील सर्व संपत्तीवर हक्क आहे फक्त त्यानें मागतां मात्र कामा नये ' जो मागतो त्याच्या सिंधूचा बिंदु होतो ' असें कवि म्हणतात देणाऱ्यानें कर्तव्य समजून द्यावें आणि घेणाऱ्यानें योग्य व आवश्यक असेल तेव्हाच घ्यावें जो स्वत संपूर्णपणें त्यागी झाला आहे, त्याला दान करण्याचा धर्म रहात नाहीं स्वहस्तें दान करण्यासाठीं त्यानें द्रव्याची अिच्छा करू नये त्याचें सर्व आयुष्य आणि पैसे मिळविण्याची त्याची शक्ति जनतेची चारित्र्यवृद्धि होअील, अशा सार्वजनिक कार्यांतच खर्च झाली पाहिजे

पुंडलीकाच्या मित्रमंडळींनीं त्याना आनंदानें आशीर्वाद दिला पाहिजे, आणि त्याचा आशीर्वाद घेतला पाहिजे सत्य आणि ब्रह्मचर्य हीं दोन व्रतें त्यानीं घेतली आहेतच आज ते अस्तेय आणि अपरिग्रह हीं व्रतें घेत आहेत. याच्या योगानें सत्यपालन त्याना सोपें जाअील. समाजात अेक मनुष्य बुद्धिपुरःसर धर्मनिष्ठ झाला तर त्याच्या चारित्र्यामुळें त्याचेशीं संबंध असलेले सर्वच कमीअधिक पुढें सरकतात याचेंच नाव दैवी संपत्तीचा विजय आज आपण नम्रतेनें विजयोत्सव करावा अर्थात् शक्य तेवढें दैवी संपत्तीकडे अधिक जावें

सुज्ञेषु किं बहुना !

काका कालेलकर

# ५२

ॐ                                    अहमदाबाद
१८-३-३०

प्रिय पुंडलीकजी,

मराठी दुसऱ्या अियत्तेंत होतों तेव्हापासून शिवाजीमहाराजाच्या आणि महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या गोष्टी अैकत होतों तेव्हापासून ज्या स्वातंत्र्याची वाट पहात होतों, तें स्वातंत्र्य आता जवळ आलेलें दिसून येत आहे. स्वातंत्र्याची पावलं स्पष्ट अेकू येअू लागलीं आहेत आणि प्रकृतीनें जर दगा दिला नाहीं, तर या स्वातंत्र्याच्या पायीं हा देह अर्पण होणार खास स्वातंत्र्य मिळाल्यानंतर जें नवनिर्माण करावें लागेल, राज्याची, समाजाची आणि धर्माची नव्यानें घडी बसवावी लागणार आहे, त्या कामीं माझा अुपयोग थोडाथोडका नाहीं, असा आत्मविश्वास आहे पण अेकाच अिच्छा होती कीं, स्वातंत्र्य मिळविण्यातच हा देह पडावा नवी घडी बसविणारे 'घडी-कुशल' असंख्य अुत्पन्न होतील, आणि मला दिसेल मोक्ष नाकारून पुन्हा जन्म घेण्याची सोय नाहीं, असें कोठें आहे ?

पण मी पहिल्या तुकडीत जाऊ शकत नाहीं मला नव्या नव्या तुकड्या तयार करून मोहिमेवर पाठवावयाच्या आहेत गांधीजींची तुकडी निघाली त्याच्या आदल्या दिवशीं विद्यापीठाच्या दोन तुकड्या येथून त्याच रस्त्यानें रवाना केल्या त्यांना आम्ही अरुण तुकड्या म्हणतों त्या पुढें जाऊन सूर्योदयाची तयारी करतात गांव साफ करणें, उतरण्याची व्यवस्था करणें, रस्त्या, पिंजण, तयार ठेवणें, वगैरे असंख्य कामें, स्वतः किंवा गांववाल्याकडून करावयाचीं असतात. प्रसंगीं आमच्या तुकड्यांना गांधीजींच्या तुकडीहून दुहेरी चाल पडते केव्हा केव्हा मागची व्यवस्था करून पुढच्या व्यवस्थेला धावपळ करीत जावें लागतें विद्यापीठातून सोळा वर्षांवरील बहुतेक सर्वच विद्यार्थी युद्धात सामील झाले आहेत, व उत्कृष्ट काम करीत आहेत आमच्या सहा तुकड्या गुजरातमध्यें ठिकठिकाणीं पसरून प्रचाराचें काम करीत आहेत पाटील-कुलकर्ण्यांचे राजीनामे म्हणजे ब्रिटिश साम्राज्याला देहांत शिक्षा या राजीनाम्याचें काम देखील आमचे विद्यार्थी आणि अध्यापक करीत आहेत

परवा बापूजींनीं नवागाम येथील भाषणात विद्यापीठानें केलेल्या खेड्या-पाड्यांतील कामाचा गौरवानें उल्लेख केला गरीबाचे कैवारी म्हणून आता आमच्या मंडळींनीं चांगली प्रतिष्ठा मिळविली आहे आनंद येथे बापूजी म्हणाले, " आता मी विद्यापीठाला शभर मार्क द्यावयास तयार आहें या वेळीं

बापूजी आज उद्या पकडले न गेले तर जलालपुरला मीठ तयार करताना पकडले जातील त्या सुमाराला गुजरातमध्यें पसरलेल्या आमच्या सर्व तुकड्या अेकामागून अेक आणून लढवावयाच्या आहेत त्यासाठीं बहुतकरून लवकरच मी तेथें जाअीन तुम्ही नवजीवन वाचत असालच

अत्यत आनदाची गोष्ट म्हणजे वि शकरनें तोंडाशी आलेल्या परीक्षेला लाथ मारून तो गांधींच्या तुकडींत सामील झाला मला भेटून तो सरळ मातरला गेला बापूजी म्हणाले, "तुला घेअू नये तर कोणास घ्यावें ?" नडियादला मी बापूजींना भेटावयास गेलों होतों भेटताच आनदानें म्हणाले, "काका, शकरनें लाज राखली" अन्य स्थळीं म्हणाले, "परिपक्व फळ टाकून शकरसारखीं मुलें आलीं तर स्वराज्य का मिळणार नाहीं ?" माझ्या आनदाची कल्पना तुम्हीच कराल शकर, बाळ, दोघेहि बापूजींचे बरोबर अेकाच तुकडींत आहेत बहुतेकीची गोष्टी खात्री लागली तरी अेकमेकाच्या शेजारी असतील याहून अधिक तें काय अिच्छावें ? नडियादला दोघाना भेटून आलों

आश्रमात हल्लीं स्त्रीराज्य चालू आहे आश्रमांतील बहुतेक सर्व कामें आणि बहुतेक सर्व खाती–व्यवस्था, किचेन, टपाल, दुकान, चर्मालय, दुग्धालय, सगळींच खातीं–स्त्रियांच्या मदतीनें चालत आहेत स्त्रियानीं आपआपल्या पतींना किंवा पुत्राना लढाअीवर जाण्याची आनदानें परवानगी दिली आणि त्याची कामें स्वत. सभाळलीं, ही काही लहानसहान गोष्ट नाहीं मिराबाअी आणि अगद ( Reginald Reynolds ) दोघाना आश्रमात महत्त्वाच स्थान आहे अगद विनोदानें म्हणाला, "बापू, you are out to destroy British Rule in India but you are establishing British Rule in the Ashram !" अगद महादेवभाअींना म्हणतो, "Mahadeo, I am prepared to do any work for Young India under you" अहिंसाधर्माचा हा विजय होय !

तुमच्या तिकडील सविस्तर हकीकत मला का कळवीत नाहीं ? तुम्ही स्वत. लिहायास नको आतां काही तुम्ही लहान नाहीं स्वतत्र पुढारी आहात अेखादे अुत्साही तरुण जवळ बाळगा व त्याला सागा कीं, अमुक

अमुक पत्रें लिही या रीतीनें तरुणाना अुत्कृष्ट खुराक मिळतो व ते तयार होतात, व तरुणाच्या सहवासात आपल्यालाहि स्वतःची अुन्नति केल्यावाचून गत्यतर नसतें त्याची विभूतिपूजा खंडित होअू नये, अेवढ्यासाठीं तरी जपावें लागेलच

आमच्या येथें अुत्थान म्हणून एक दैनिक हस्तलिखित निघत असतें त्यात विद्यार्थ्यांस अुपयोगी अशा बातम्या असतात तुम्ही देखील सायक्लो-स्टाअीलवर पाअूणशें शभर प्रती काढून कर्नाटकातील मुख्य मुख्य केंद्राकडे पाठवाव्यात या कामीं ८–९ मुलें तयार करा अशा हस्तलिखित पत्राचा परिणाम अुत्तम होतो खरीखुरी माहिती मिळते आणि सर्व केंद्राचें संगठन होतें परिचय वाढून माणसें आपलींशीं होतात

असो पत्र फार लाबलें आणि पुष्कळ पत्रें तुंबून राहिलीं आहेत चंद्र-शकर सोनगढहून आज परत यावयास पाहिजे होते त्याची प्रकृति ठीक नव्हती, म्हणून त्याना तेथें पाठविलें होतें बाबासाहेबाचें कसें काय चाललें आहे ? दिवाकराशीं तुमचा संबंध वाढत असेलच कर्नल सदाशिवराव काय करतात ? शंकरराव गुळवाडींचा या वेळीं पुष्कळ अुपयोग झाला पाहिजे तिमाप्पा नायकाना आता बाहेर काढा त्याचा तापट स्वभाव फार कामाला येअील रामचंद्र वडवी काय म्हणतो ? सिद्दुराव कोठें आहेत ? कृष्णा गोसावीचा देखील जरूर अुपयोग करा सिद्दगोडा सापडल्यास त्यास शोधून काढा आणि त्याला जेलमध्यें पाठवून या सिद्दुरावाना त्याचा पत्ता माहीत असेल तुमचे दोस्त गोडसे बापूजींच्या तुकडींत आहेत

कर्नाटकातील स्त्रियाना जागृत करण्याचें काम कोण करील ? कर्नाटका-तील स्त्रिया सबंध हिंदुस्थानला चकित करून सोडतील अितका त्याचा निर्धार आहे त्याना कोणी तरी जागृत केलें पाहिजे सारस्वत स्त्रियाची देश-भक्ति आता चागलीच अुद्योन्मुख आहे

काकाधा

सप्रेम वंदे मातरम्

# ५३

ॐ    गुजरात विद्यापीठ
अहमदाबाद
जेठ कृ ११, बुध.

प्रिय पुंडलीकजी,

तुमचेकडून बरेच दिवसांत पत्र नाहीं, याचें भयंकर आश्चर्य वाटतें अजूनहि खाजगी अेस्टेटीचें शेपूट संपलें नाहीं, असें दिसतें कोण्यापि लोक कौटुंबिक व्यवहार संभाळतात, आणि राष्ट्रकार्याकडे दुर्लक्ष करतात, आणि त्यामुळें राष्ट्रकार्य बुडतें आपण काहीं जणांनी याचे अुलट केलें पाहिजे घरगुती गोष्टींकडे संपूर्ण दुर्लक्ष यापायीं वाटेल तें नुकसान होवो, पण राष्ट्राचा व्यवहार अखंड आणि चोख चालला पाहिजे दोन्ही बाजूंतीत दक्षता ठेवू शकणारे सव्यसाची आपण खास नाहीं आहात दोन्हीकडे पक्षपातरहित दुर्लक्ष करणें आपल्याला सहज साधेल, पण त्यात पुरुषार्थ नाहीं महासभेनें अस्पृश्यता-निवारणसमिति डिसेंबरपर्यंत काम करण्यासाठीं नेमिली आहे आणि तुमच्या कामाला जुलाओ महिना सुरू झाला तरी ठिकाणा नाहीं! गंगाधररावाच्या माणसाच्या कामाची धडाडी लोकांनीं अशीच अनुभवावी की काय? स्वतःचे विचार, आकांक्षा आणि जुनी बहादुरी याचा स्तव करीत बसल्यानें आत्मरतीचा आनंद मिळेल, पण प्रवृत्ति थांबेल कामें वेळेवर केलीं नाहींत तर पुढें तीं होतहि नाहींत

हा तुम्हाला उपदेश लिहीत नाहीं, पण माझा कडू अनुभव कळवीत आहें

सध्या गंगाधररावाच्याकडे कोणीच नाहीं असें दिसतं कुमगीला आश्रम करणें अिष्ट असेल तर ही शेवटची संधी आहे, असें समजा अेकदा वेळ गेली म्हणजे अुत्साह आणि अनुकूलता हीं जमून येत नाहींत डिसेंबरपर्यंत जोरानें जमनालालजींचें काम करून जानेवारींत कुमगीला जाअून राहणें

तुम्हाला शक्य नाहीं काय? बाबासाहेबांनीं आतापासून तयारी केलेली काय वाओट ?

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

  

## ५४

ॐ गुजरात विद्यापीठ
अहमदाबाद
मार्गशीर्ष व. १ श. १८८१, रविवार

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें पत्र मिळालें. माझेच ओझीं काय कमीं आहेत म्हणून माझ्यावरतीनें नवीन ओढून आणतां ? पण तुम्ही घोटाळे अुत्पन्न करावेत आणि मी ते न निस्तरावे हें कधीं बनलें आहे ? मग मी काका कसला ?

आता असें करा कीं, हें पत्र पाहतांच येथें निघून या. शिक्षणसप्ताहाचा महोत्सव मला साजरा करावयाचा आहे. काम यथेच्छ वाढलें आहे. तुमचा मी पुष्कळ अुपयोग करून घेअू शकेन. काम सपलें, म्हणजे विद्यागी म्हणून माझेकडून लेख घेण्याचा पुरुषार्थ करा. माझ्या कामानिमित्त थोडासा प्रवास करावा लागला तर तुमची तयारी आहे असें मी समजतों.

अस्पृश्यता-निवारणाचें काम अुत्तम आहेच. पण सर्वोत्तम माणसें अुत्तम कामासाठीं देखील राजसेवेंत देअू नयेत. सामान्य कोटीचा कोणी हातीं आल्यास त्याला ढकलून या.

काका

  

## ५५

वर्धा

पू. श्री. गंगाधरराव यांचे सेवेसी,

विज्ञापना विशेष

आपल्याला मधून मधून ताप येतो, हें वाचून चिंता वाटते. आतां आपण चांगली विश्रांति घेऊन प्रकृति सुधारली पाहिजे.

आठवणी लिहिणें आपल्याला अेक अत्यंत आनंदायक व्यवसाय होईल आणि पुढील पिढीला अेक अत्यंत महत्त्वाचा दस्तअैवज मिळेल. राष्ट्राच्या हितासाठीं हें लिहावयाचें आहे, तेव्हां कोणताहि संकोच न बाळगतां जें कांहीं लिहावेंसें वाटेल, तें लिहून काढावें. पुढें तें सर्व आपण सावकाशीनें 'अेडिट' करावें, पण प्रथम जसें मनांत येईल तसें लिहून काढावें. अेडिट करतांना माझा अुपयोग होईल खरा.

मी जर कांहीं महिने आपल्या सहवासांत राहिलों, तर मात्र अनेक गोष्टी लिहिण्याचा आपल्याला पान्हा फुटेल याची मला जाणीव आहे. पण हें घडावें कसें? आज तरी तें अशक्य आहे.

पुंडलीकला मी वारंवार पत्रें लिहितोंच. त्याची चिकाटी, त्याची कर्मनिष्ठा, आणि आशावाद हीं असाधारण आहेत. आपण जितकी मंडळी जवळ केलीत, त्यांमध्यें निष्ठेच्या बाबतींत पुंडलीकचा नंबर बराच वर लागेल.

बापूजींचा सत्याग्रह आतां सोळाहि कळांनीं प्रकाशित होणार आहे. राष्ट्राच्या नशीबांत असेल तेवढें पदरांत पडेल, पण बापूजी मात्र आदर्श सत्याग्रह आणि त्याचें कार्य कसें होतें, याचा नमुना जगापुढें मांडणार खरे! कळावें, हे विज्ञापना

सेवक

दत्तात्रेय

५६

विद्यापीठ
अहमदाबाद
३०-६-३१

प्रिय पुंडलीकजी,

प्रथम विचारून घेतों, आपल्या नोटपेपरवर गांधीसेवासंघ वगैरे अिंग्रजींत कां? हिंदींत कां असूं नये? वाटल्यास नागरी व अिंग्रजी दोन्ही लिपी ठेवाव्या आणि दाअीप लहान वापरावा.

आश्रमाचीं कामें वेळच्या वेळीं होतात, हें फार अुत्तम आहे. आश्रम-जीवन म्हणजे कांहींतरी पारमार्थिक (Serious) आणि पवित्र वस्तु आहे, ही गोष्ट नियमितपणानेंच अुत्तम ठसते. तुम्ही लिहितां, पू. गंगाधरराव बहुतेक प्रार्थनेस हजर असतात. मी अीश्वराजवळ प्रार्थना करतों कीं, त्यांनीं नेहमींच नियमित प्रार्थनेस यावें अशी सोय व्हावी.

शेवटीं दळण दळण्याचें काम तुमच्या नशिबीं आलें ना!

अच्युताची प्रगति वाचून फार आनंद झाला. त्याच्या नेत्रिंगीविषयीं तुम्ही कांहीं लिहिलें नाहीं.

## ५७

अहमदाबाद
१०-९-३१

प्रिय पुंडलीकजी,

आलेलीं पत्रें सविस्तर वाचण्याअितकी देखील फुरसत मिळत नाहीं, अशी माझी दुर्दशा आहे मी फार काम करतों, अशातला भाग नाहीं पण अजून वसच वसविता येत नाहीं अव्यवस्थेमुळें सेवेच्या ठिकाणीं असेवा होते तरी देखील लोक सहन करतात, कौतुक करतात, हा जगाचा भोळेपणा आहे, अुदारता आहे तुमच्या कामात व्यवस्थितपणाचा आग्रह आहे, याचा आनंद न होवा वाटतो शेवटच्या आपल्या युद्धानें सायक्लोस्टाअीलचा नवु सुरू झाला आहे वापूजी नवजीवनाच्या पूर्तीमध्यें खेडेगावांतील शिक्षणाविषयीं लेख लिहीत असत त्याचें अेक लहानसें पुस्तक लोकरच प्रसिद्ध करणार. तुमच्या प्रचारकार्याला अुपयोगी पडेल जे खात्रीनें वाचतील आणि जपून ठेवतील अशानाच पत्रिका पाठवाव्यात

पोटासाठीं दळावें आणि तुरुंगासाठीं देखील दळावें विद्यार्थ्यांचा अभ्यास-क्रम येथून सुचविणें शक्य नाहीं तरुणाचा अुत्साह, त्याचें सामर्थ्य, आणि वातावरण हीं पाहून आणि परिस्थित्यनुरूप ठरवायाचें असतें पुष्कळदा विषय शिकविण्यापेक्षा विषयाविषयीं अुत्साह अुत्पन्न करून देणेंच महत्त्वाचें असतें हिंदी सर्वांना आलेंच पाहिजे सोपी हिंदी शुद्ध अुच्चारासह तोंडपाठ करून घ्या, म्हणजे अल्पश्रमानें व्याकरणशुद्ध हिंदी येअील ' चीनकी आवाज ' पुस्तक कठीण आहे मूळ अिंग्रजीवरोबर वाचल्यास चांगलें विद्यार्थ्यांशीं अनिश्चित व मोघम न बोलण्याचा नियम शिक्षणाच्या आणि सत्यपालनाच्या दृष्टीनें सर्वोत्कृष्ट आहे वडनींचें पुस्तक मी अवश्य अैकेन येथें आश्रमात कानडी जाणणारे एकदोघे आहेत मला श्रवणभक्ति करणेंच शक्य आहे

दक्षिण आफ्रिकेच्या सत्याग्रहाचें पुस्तक सत्याग्रहावर प्रमाणभूत ग्रंथ आहे त्याचा साराश कानडींत छापलात तर मूळ पुस्तक राहून जाअील

माझ्या मतें मूळ पुस्तकच सरळ कानडींत करून बाल्यास दोन भागात छापावें, आणि समग्र पुस्तक बारा आणे किंवा एक रुपयाला विकावें मूळ ग्रंथ सोपा, साधा आणि प्रासादिक आहे आणि निष्कारण पाल्हाळ कोठेंच नाहीं माझा अभिप्राय गगाधररावाना कळवून ते सागतील त्याप्रमाणें करावें

नडवीचें पुस्तक तयार करून त्याचा पुष्कळ प्रचार करा मला वाटतें, आश्रम चालवायचा आणि त्यासबद्दल लोकात सहानुभूति अुत्पन्न करावयाची तर आश्रमानें थोडें प्रकाशन कार्य केलेंच पाहिजे पैसे मिळण्याच्या दृष्टीनें आणि सेवक मिळण्याच्या दृष्टीनें देखील प्रकाशन आवश्यक आहे दोन अेक हजार रुपये या कामात गुतवून ठेवले, तर त्यापासून नुकसान न होता लाभच होअील

येथें वर्किंग कमिटीनें आठ दिवस राहून पुष्कळ काम केलें काँग्रेसची प्रतिष्ठा दिवसेंदिवस वाढू लागली आहे स्वराज्य आपोआप हातीं येअू लागलें आहे

चद्रशकरचें हस्ताक्षर असल्यानतर माझी सही विसरून राहिली तरी हरकत नाहीं तुमच्यावरचा फॉरिनर्स ॲक्ट तेव्हाच रद्द होअील कीं, जेव्हा अिंग्रज लोक या देशात फॉरिनर्स आहेत, हें कबूल करण्यास तयार होतील

आश्रमात अहीसाहेबासारखा अेखादा मुसलमान असणें अिष्ट आहे अेखादा मुसलमान घेणे हा आपला राष्ट्रीय धर्म आहेच आणि ' धर्मो रक्षति रक्षित '।

तुमच्या मामाविषयींचें पत्र आजच पोहोचलें त्याना पोसण्याचा धर्म तुमच्याकडे येत नाहीं पुष्कळ वर्षें सबध तुटल्यानतर जबाबदारी ग्हात नाहीं तुम्ही स्वत च हा निश्चय करावयास पाहिजे होता गगाधररावानीं दिलेली सल्ला बरोबर होती पण तुम्ही त्याना विचारण्याचीहि आवश्यकता नव्हती असहाय स्थितींतील मनुष्याचा वाली समाज आहे बाबासाहेबाना दिलेलें वचन पाळलेंच पाहिजे

रागाच्या भरात आणि स्वार्थामुळें महात्माजींना शिव्याशाप देणाऱ्याच्या मनातून देखील महात्माजींविषयींचा खरा आदर कमी होत नसतो

मामांना नाहीं म्हटलें, यांत मनाला खाण्याजोगें काय आहे? तुमच्या-मध्यें शिपाओपेशा कमी असला आणि सत्यासदीक्षा निसरला असला तर काहीच अिलाज नाहीं देशम्यभाओी खरेच! पुस्तकाविषयीं अुर्वा

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

  

## ५८

अहमदाबाद

७-१-३०

प्रिय पुंडलीकजी,

मला वाटतें, मी तुम्हाला नुकतेंच अेक पत्र लिहिलें आहे मानसिक संकल्पानें तर वारंवार किती तरी पत्रें तुम्हाला लिहितों, त्यामुळें खरोखर अमुक पत्र गेलें किंवा नाहीं, लिहविलें किंवा नाहीं, याचा घोटाळा होतो

मी परवा मुंबअीस जाअून आलों बापूजींची प्रकृति अुत्तम आहे पूज्य गंगाधरराव खूप अुत्साहांत होते बाबासाहेब सोमण आहेत तसेच होते व्हॉअिसरॉयशीं झालेला तारव्यवहार व कार्यकारिणी समितीचा ठराव यांत सर्व काहीं येअून जातें तेव्हा मी नवीन तें काय लिहिणार? आता तुमची तयारी जय्यत असेल

अस्पृश्यता निवारण आणि खादी हीं कामें मुख्य आहेत भ्याड व अत्याचारी या दोन वर्गांनीं जमाव करू नयेत, आणि खेडेगावांतून विशेष प्रचार व्हावा

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

  




५९

अहमदाबाद

५।१।३४

प्रिय पुटलीक,

कालपासून सविनय भंग सुरू केला मला पकडून रात्रीं नऊ वाजता सोडून दिलें पोलीस खेळ खेळू पाहतात पण यामुळें मला अुत्तम संधी मिळणार आहे आतां वातावरण गरम करण्याचें सुरू करणार आता पाहू मला किती संधी देतात तें

तुमची गोष्ट खरी आहे गल्लींतील स्वयंस्फूर्तीची फरशी हीच तुमच्या सेवेची अुत्तम निशाणी आहे

अुपवास शास्त्रशुद्ध असो वा नसो, त्यातून काहीं चांगले परिणाम अुत्पन्न होणारच त्यापैकींच हा आहे अुपवासाची मीमांसा भेटू तेव्हाच करू अुपवास बरेच टक्के शुद्ध होता, असें म्हणता येअील पण मला पूर्ण खात्री नाहीं अशुद्ध असल्यास पुढें त्याचे अनिष्ट परिणाम दिसून येतील

हिंडलग्याच्या प्रसादाविषयीं अुपवास करू शकणार नाहीं, वगैरे लिहिलें तो कौतुकमिश्रित विनोद होता त्यात तुमचेवर टीका मुळींच नव्हती.

२०० फूट बाकी राहिलेला रस्ता तुमच्या गैरहजेरींतच झाला पाहिजे तुमच्या परत येण्यावर राहता कामा नये रस्ता दामटत पुढें नेलात याबद्दल अभिनंदन

काकाचा

सप्रेम वंदे मातरम

६०

प्रस्तावना– मंगल प्रभातच्या कानडी भाषांतरासाठीं

## जीवन–रसायन

महात्मा गांधींच्या जीवनसिद्धांताचें सर्व रहस्य 'मंगल प्रभात' या छोटेखानी पुस्तकांत येऊन गेलेलें आहे सर्व धर्मांचें सारहि यांत अर्क-रूपानें दिसून येतें आचरणांत आणावयाचा म्हणून जेवढा धर्म आहे, तो सर्व आदर्शरूपानें येथें समाविष्ट झाला आहे व्यक्तिगत, सामाजिक व राष्ट्रीय सामर्थ्य हीं वाढविण्याचा खरा अिलाज गांधीजींनीं येथें दाखविला आहे या रीतीनें चालल्यास आपले हातून कोणाचेंहि अकल्याण न होतां स्वतःचें व सर्वांचें कोटकल्याण होणार आहे

यांत दाखविलेला मार्ग आधुनिक विचारप्रवाहाला महत्त्वाचा वाटतो, थोरपणाचा वाटतो, पण तो व्यवहार्य आहे, असें पटून घेण्याची फार थोड्यांची तयारी असते हा मार्ग सर्वांसाठीं नाहीं सर्वांना झेपेल असा सोपा मार्ग आम्हाला हवा आहे आंतरिक सुधारणा बहुजनासाठीं अशक्य आहे बाह्य फेरफारानींच जगाची परिस्थिति बदलली पाहिजे, असें म्हणणारे पुष्कळ आहेत

या दोन मतामध्यें जगद्व्यापी गजग्राह सुरू झाला आहे यांपैकीं आत्म्या वर, मनुष्य–हृदयावर, अीश्वराच्या मांगल्यावर विश्वास ठेवणारा मार्ग समजून घेण्यासाठीं याहून दुसरा सोपा ग्रंथ नाहीं खरा मार्ग हा अेकच आहे, दुसरा नाहीं, असल्यास तो याचाच पर्याय असणार, असा येथें विश्वास आहे

बेळगावच्या हिंडलगा जेलमध्यें असतांना श्री पुंडलीकजींच्या प्रेरणेनें चि रामचंद्र वडवी यांनीं मंगल प्रभातचें कानडी भाषांतर केलें लहानपणीं कारवार, धारवाड व बेळगाव येथें जी कांहीं थोडी कानडी भाषा कानावरून गेली होती, ती विसरून गेल्यावर बाकी अुरलेल्या संस्काराच्या जोरावर मी हें भाषांतर जेलमध्यें काळजीपूर्वक अक्षरशः तपासून गेलों आहें व आतां तें अगदीं बरोबर आहे कोठेंहि मुद्यांतील भावाशीं विसंगत नाहीं, अशी

माझी खात्री झाली आहे. या पुस्तकांत दाखविलेल्या मार्गाप्रमाणें आपलें जीवन असावें, अशी वडलांची इच्छा आहे. अल्पांशानें का होईना तसा त्यांचा प्रयत्नहि आहे व म्हणूनच हें भाषांतर त्यांनीं अितक्या आस्थेनें केलें आहे.

हा ग्रंथ अेका बैठकींत वाचून टाकण्याचा नाहीं. अंतर्मुख होअून शांत-पणें याचें मननपूर्वक पारायण झालें पाहिजे व स्वतःच्या आयुष्यांत काय काय फेरफार केला पाहिजे याचें चिंतनहि झालें पाहिजे, तरच हा ग्रंथ चिंतामणी होअील. विचारमय जीवन व अुत्साहरूपी आस्तिकता हीच प्रगतीची पूर्वपीठिका आहे.

या लहानशा पुस्तकानें कानडी साहित्य समृद्ध होअील असा विश्वास आहे.

काका कालेलकर

## ६१

[illegible]

[illegible]

प्रिय पुंडलीकजी,

# ६२

नवजीवन-कार्यालय,
अहमदाबाद
१३-१-३४

प्रिय पुंडलीकजी,

येथील पोलिसानीं थोडासा वाचळटपणा केला मी कलेक्टरला पत्र लिहिलें होतें कीं ४ तारखेपासून सविनय भंग करणार हस्तलिखित पत्रिका काढीन किंवा रास गावापर्यंत कूच करीन त्यानीं आम्हा तिघाना-मी, अंबालाल व सुरेंद्र मश्रुवाला-पकडून मध्यरात्रीं सोडून दिलें त्यांना म्हटलें कीं, " ही ब्याद कशाकरून रासला जाअील खेड्याचे पोलीस ह्यांना पकडू देत. आपल्या येथें सर्व थंड आहे, असें जें आपण म्हणतों, त्याला गालबोट कशाला? " मी रासला न जाता पत्रिकाची झोड अुठवून त्याच्या राशीस लागलों. पहिल्या दिवशीं लोक पत्रिकाना हातहि लावीनात, जणू काय विंचूच! पण पुढें अुड्या पडू लागल्या मी दोन पत्रिकासहित अेक पत्र पुन्हां कलेक्टरला लिहिलें त्यांत म्हटलें होतें कीं, मध्यरात्रीं सोडण्यासारखे चिमटे घेणें सर्व समर्थ सरकारला शोभत नाहीं Civil Register च्या कृतीला सरकारचा Response हि civil असावा मी त्यांना कळविलें कीं, मला रासला जाण्याची घाअी नाहीं मी पत्रिका काढणार, भाषणें करणार

अेका पत्रिकेंत मी लिहिलें, " आम्हाला न पकडून सरकारला अेंपावयाचें नाहीं तेव्हा पोलीस अिरेला पडले त्यानीं पकडावयाचें नाहीं, असें ठरविलें मला काय? आम्ही कार्बन पेपर घेअून पत्रिका काढण्याची गिरणीच चालविली दरेक पत्रिकेवर माझी सही असे, व भर रस्त्यावर पत्रिका वाटू लागलों. शेवटीं पोलिसानीं नीति बदलली प्रथम अंबालालला पकडला नंतर सुरेंद्राला त्याच्यावर सोमवारीं खटला होणार आता जेलमध्यें जाण्यास तयार असे स्वयसेवक नसल्यानें व चोरून काम करावयाचें नसल्यानें रस्त्यावरच्या पत्रिका बंद केल्या,

व हातोहातीं व पोस्टांतून पत्रिका नुसत्या अहमदाबादेंत नाहीं, पण गुजरातभर पाठवूं लागलों आहे. पत्रिकांची संख्या कमी झाली आहे, पण जोम कमी झाला नाहीं. लोक सायक्लोस्टाअिल वापरण्याचा आग्रह करीत होते. मी नाहीं म्हटलें. कारण अुघडपणें वापरल्यास लुटून नेतील व गुप्तपणें वापरल्यास ठिकठिकाणीं झडत्या करून नाहक दुबळ्या लोकांना त्रास देतील. मला निर्भयतेचें वातावरण अुत्पन्न करावयाचें आहे. मी आमच्या बंगल्यांत अुघडपणें पत्रिका काढतों. सी. आय्. डी. येअून बघतात; पण कांहीं करीत नाहींत. मलाहि पकडीत नाहींत. आतां गांवांत जाअून भाषणें सुरू करणार. प्रथम लोक येणार नाहींत, पुढें येतील. व मला रोज पकडून रोज सोडलें तर ही त्रिस्थळीची नवी शिक्षा समजून निदान अेक वर्ष तरी हात्र पिच्छा पुरवीन. सध्यां आश्रमाची तुकडी नाशिकहून व साबरमतीहून सुटून येण्याची वाट पहात आहें. २४ तारखेला जमतील. नंतर रासची कूच करण्याचा विचार आहे. तोंवर सध्यां रिक्रूट भरतीची कल्पना पसरवीत आहें. ऑगस्टमध्यें बापूजी सविनय भंग करावयास येतील, त्या वेळीं त्यांच्याबरोबर आश्रमवासी नसणार. म्हणून गुजरातनें १००–२०० लोक ऑगस्टपर्यंत तयार करावेत, असा प्रचार करीत आहें. जुळेलसें दिसतें.

पहिल्याच दिवशीं पकडलों गेलों असतों तर जेलयात्रा अळणी झाली असती. सध्यां काम करीत आहें, यामुळें मौज वाटते. तुम्ही त्या वर्षीं धांवपळ करून जी गंमत केलीत, ती मला घरबसल्या मिळत आहे. सोमवारीं मी कोर्टांत जाअून बसणार. पत्रिका लिहिणाऱ्या मला न पकडतां त्या वांटणाऱ्या अंबालालला व सुरेंद्राला माझ्या डोळ्यांदेखत शिक्षा करतांना पाहून मला गंमत वाटेल; व पकडलें तरी गंमतच आहे. पैसा अुडवून शकुन बघतात, त्या वेळीं अिंग्रजींत म्हण आहे, 'Heads I win, tails you lose' म्हणजे मुखवस्त्याची बाजू वर आली तर माझा विजय झाला आणि अक्षरांची व सनाची बाजू वर पडली तर तुम्ही हरलांत, अशी माझी मौजेची स्थिति आहे.

मध्यंतरीं अेका दांतानें तक्रार सुरू केली. तेव्हां त्याला डॉक्टर दाखविला. आतां तोंडांत चावायला अेक दांत कमी झाला. पण पोसावयाला देखील अेक दांत कमी झाला. अेवंच हिशेब सारखाच! असो.

आत्मपुराण फार लांबलें तुमचें फरशीचें काम उत्तम जुळलें, असें दिसतें मला भीति वाटते, तुमचें नाव 'फरशी पुंडलीक' पडणार आहे लहानसहान गल्ल्यांतून वेडेनाकडे धोंडे बसवल्यानंतर जाल्याना दार्की घालण्याचीं अवजारें असतात, तशीं पुष्कळ आणवून लोकांकडून दगडांतील उंचवटे तोडवून घ्यावेत, म्हणजे लहान मुलांना पडून कपाळाला खोक पडणार नाहीं दर सोमवारीं अेक तास हें काम करील, त्याला मोठें पुण्य मिळेल, असें माझ्या वतीनें सांगा 'फरशी पुंडलीक' अकलगीला गेले तर वाअीट नाहीं

प्रत्येक रंगाला निराळा ब्रश, ही नीति तुमच्या प्रतिभेची द्योतक आहे तिचा नेहमीं विजय असो वामनराव देसाअी यांना माझा नमस्कार कळवा

माझी प्रकृति कामचलाअू आहे काम कधींच अडू देत नाहीं तुमच्या हाताला पुष्कळ सभाळा, व सरकारला हात दाखवा

गंगाधररावाच्या प्रकृतीविषयीं तुम्ही काहींच लिहिलें नाहीं, त्यावरून ती उत्तम आहे, असें मी अनुमान करतों त्यांना माझा प्रणाम कळवा वेळ असता तर पुष्कळ लिहिलें असतें

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

— — —

## ६३

ॐ

अहमदाबाद
२२-१-३५

प्रिय पुटलीकजी,

तुमचें ता १९ चें पत्र पोहोचलें तुमचा नवीन ब्रश व नवीन रंग मजेदार आहेत हुबळी सोडतांना तुम्ही बहुतकरून लोकांना सांगितलें असेल कीं, आतां सब्वादोनशें फूट फरशी जोवर पुरी झाली नाहीं,

तोंवर तुमच्या गांवीं अन्नग्रहण करणार नाहीं. किंबहुना पाअूलहि टाकणार नाहीं !!

परवां माझी पत्रिका वांटण्याबद्दल अंबालाल पटेल याला सहा महिन्याची शिक्षा झाली. मी कोर्टांत होतों. पत्रिकेचें नांव काका कालेलकरनी पत्रिका नं. असें असतें. कोर्टांत ती वाचलेली अैकून कौतुक वाटतें. काल प्रभाशंकर म्हणून-राजकोटच्या अेका गृहस्थाला माझ्याच नव्या पत्रिकेसाठीं पकडलें. आतां त्यालाहि शिक्षा होअील.

तो गेला अितक्यांत आश्रमांतील बायका मंडळी (बापूजींच्या तुकडीतील १४) आज सुटून आली. त्यांपैकीं प्रेमाबेन कंटक मजबरोबर येणार. अेकूण आम्ही पुन्हां तीनचे तीन झालों. अुद्यां, माझें व्याख्यान 'स्वदेशी व आंतरराष्ट्रीयता' या विषयावर आहे. त्या दिवशीं कांहीं कार्यक्रम ठेवूं. चि. बाळ आज सुटला असेल. अुद्यां सकाळीं मुंबअीहून येथें येअील, असें वाटतें.

माझी प्रकृति अुत्तम आहे. पण अेक अुपाधि अजून सुटली नाहीं. अक्कलदाढ अुपटून घेतल्याचें मागील पत्रांत मी लिहिलें किंवा नाहीं, तें स्मरत नाहीं. त्या वेळचें क्लोक अिंजेक्शन अितकें खोल गेलें कीं, आतां तोंड अुघडणें कठिण झालें आहे. कृत्रिम दांत काढणें, घालणें कठीण. तोंड धुतांना, जीभ घासणें दुरापास्त झालें आहे. आठ दहा दिवस झाले. अजून पांचसात दिवस ही पीडा राहणार, असें दिसतें. तुका म्हणे 'उगी रहावें, जें जें होअील तें तें पहावें.' शरीर जर असें रोज खोड्या करील तर त्याला संभाळून ठेवण्यांत लाभ कोणता ? क्रम विसर्जन करून टाकावा, यांतच शोभा आहे.

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

आत्मपुराण फार लांबलें तुमचें फरशींचें काम अुत्तम जुळलें, असें दिसतें मला भीति वाटते, तुमचें नाव 'फरशी पुंडलीक' पडणार आहे लहानसहान गल्ल्यातून वेडेवाकडे धोंडे बसवल्यानंतर जात्याना टाकी घालण्याची अवजारें असतात, तशीं पुष्कळ आणून लोका कडून दगडातील उंचवटे तोडून घ्यावेत, म्हणजे लहान मुलाना पडून कपाळाला खोक पडणार नाही दर सोमवारीं अेक तास हें काम करील, त्याला मोठें पुण्य मिळेल, असें माझ्या वतीनें सांगा 'फरशा पुंडलीक' अकलगींला गेले तर वाअीट नाही

प्रत्येक रंगाला निराळा ब्रश, ही नीति तुमच्या प्रतिभेची द्योतक आहे तिचा नेहमीं विजय असो वामनराव देसाअी याना माझा नमस्कार कळवा

माझी प्रकृति कामचलाअू आहे काम कधींच अडू देत नाहीं तुमच्या हाताला पुष्कळ सभाळा, व सरकारला हात दाखवा

गंगाधररावाच्या प्रकृतीविषयीं तुम्ही काहीच लिहिलें नाहीं, त्यावरून ती अुत्तम आहे, असें मी अनुमान करतों त्याना माझा प्रणाम कळवा वेळ असता तर पुष्कळ लिहिलें असत

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

ॐ

अहमदाबाद
२२-१-३४

प्र नवीन रंग

तोंवर तुमच्या गांवीं अन्नग्रहण करणार नाहीं. किंबहुना पाअूलहि टाकणार नाहीं !!

परवां माझी पत्रिका वांटण्याबद्दल अंबालाल पटेल याला सहा महिन्या-ची शिक्षा झाली. मी कोर्टांत होतों. पत्रिकेचें नांव काका कालेलकरनी पत्रिका नं. असें असतें. कोर्टांत ती वाचलेली अैकून कौतुक वाटतें. काल प्रभाशंकर म्हणून-राजकोटच्या अेका गृहस्थाला माझ्याच नव्या पत्रिकेसाठीं पकडलें. आतां त्यालाहि शिक्षा होअील.

तो गेला अितक्यांत आश्रमांतील बायका मंडळी ( बापूजींच्या तुकडीं-तील १४ ) आज सुटून आली. त्यांपैकीं प्रेमाबेन कंटक मजबरोबर येणार. अैकूण आम्ही पुन्हां तीनचे तीन झालों. अुद्यां, माझें व्याख्यान 'स्वदेशी व आंतरराष्ट्रीयता' या विषयावर आहे. त्या दिवशीं कांहीं कार्यक्रम ठेवूं. चि. बाळ आज सुटला असेल. अुद्यां सकाळीं मुंबअीहून गेथें येअील, असें वाटतें.
.स नाहीं आहा.

माझी प्रकृति अुत्तम आहे. पण अेक अुपाधि ., साधेल; पण त्यांत
अकलदाढ अुपटून घेतल्याचें मागील पत्रांत म
तें स्मरत नाहीं. त्या वेळचें ब्लॉक अिंजेक्शन ? डिसेम्बरपर्यंत काम करण्या-
तोंड अुघडणें कठिण झालें आहे. कृत्रिम ! जुलाअी महिना सुरू झाला
तोंड धुतांना, जीभ घासणें दुरापास्त झालें णसांची कामाची धडाडी अशीच
अजून पांचसात दिवस ही पीडा राहा र, आकांक्षा, आणि जुनी बहादुरी
रहावें, जें जें होअील तें तें पहावें 'आत्मरती' चा आनंद मिळेल पण प्रगति
त्याला संभाळून ठेवण्यांत ल कलीं नाहींत तर पुढें तीं होत नाहींत.
यांतच शोभा आहे. । लिहीत नाहीं; पण माझा कडू अनुभव

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

# ६६

ॐ                                        अहमदाबाद

७-४-३४

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें कार्ड पाहोंचलें बाबासाहेब सोमण यानीं पाठविलेला कार्यक्रमहि पोहोंचला आभारी आहें मी बाहेर आहें, तोंवर माझेकडून निश्चातल्या कोणत्याहि लिखाणाची प्रस्तावना घ्या. पुढें अिलाज नाहीं माझींच अुत्तरें छापण्यात औचित्यभग होणार नाहींना ? व तुमची अुत्सुकता 'तुमच्या' सस्थेवर लादण्याचा गुन्हा होत नाहींना ?

चि बाळ राजेंद्रबाबूकडे गेला आहे.

तुम्हाला अेक आनदाची बातमी देणेची आहे चि शकर व बाळ याची माझ्या योजनेस समति मिळाली बेळगुंदीचीं दोन शेतें, बगीचा व विकलेलें घर परत विकत घेण्याअितके पैसे, सर्व अेस्टेट हरिजनार्थ आश्रम काढण्यासाठीं देण्याचें ठरलें व त्याप्रमाणें चि शकरच्या हातून पू बापूजींना पत्रहि गेलें आमच्या मत्तेपैकीं माझा व बाळाचा भाग आम्ही अशा रीतीनें काढून टाकला शकरचा भाग तो स्वतःच्या विद्याभ्यासासाठीं ठेवणार आहे आश्रम व विद्यापीठ दोन्ही सस्थाचा आज होम झाल्यावेळीं चि बाळानें सर्व परिग्रह सोडून देण्याची हिंमत केली, हें मला विशेष आवडलें The less I have, the more I am आता तुम्ही आम्हाला हिणावायाला नको ! माझीं पुस्तकें सर्व दिलीं गेलीं वडिलार्जित अैवज आता जात आहे ( मी तर पूर्वीच सोडून दिली होती ) आता माझें म्हणावयास फक्त स्वकष्टार्जित पापपुण्य व फुकटचें मिळालेलें मित्रमडळ अेवढेंच आहे पापपुण्य देय नाहीं व मित्रमडळ सर्वांना मोकळें आहे. बेळगुंदीचें घर गावात मध्यभागीं आहे, तेथें हरिजन राहू लागणें अत्यत जिरू आहे घर विकलें त्याचे सगळे पैसे अजून आले नाहींत व ज्यानें घेतलें तो दोनशें रुपये कमी करून परत द्यावयास तयार आहे, असें समजतें.

बाळाचे पैसे या कामीं वापरून घर परत घेतलें पाहिजे आपली गरज त्याला कळली तर अधिक मागावयाचा तुम्ही अेक ट्रस्टी आहात म्हणून हें सर्व विस्तारानें लिहीत आहे आता अेक अुत्तम आश्रम चालविण्याची जबाबदारी तुम्हा मंडळींची आहे रामकृष्ण प्रभु, श्रीरंग कामत, तुम्ही, सतू, जें कराल तें खरें आमच्या बागेंत प्राचीन काळीं एक सती, सती गेली होती म्हणून मी त्या स्थानाला पूर्वी 'सती लॉज' म्हणत असें आता शंकर जें नाव देअील तें खरें

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

६७

ॐ लाहोर,
१३–७–३४

पूज्य श्री गंगाधरराव यांचे सेवेसी

विज्ञापना विशेष

आपलें ता ८–७–३४ चें पत्र मला काल रात्रीं येथें मिळालें फार आनंद झाला जेलमध्यें आहारातून पुरतें पोषण न मिळाल्यामुळें वजन १५ रत्तल कमी झालें होतें त्यापैकीं तीन रत्तल आजवर परत मिळविलें

हरिजनाचें कार्य पतकरून सोडलें तर, त्या अनाथांचा आपलेवरील विश्वास अुडून जावयाचा यासाठीं पूर्ण विचार करून मगच प्रभूनें हें कार्य हातीं घ्यावें मला प्रायश्चित्त घेण्याची पाळी आणू नये दृढ संकल्पानें हें कार्य घेअील व आश्रमात पावित्र्य संभाळील तर सर्वप्रकारें भाग्योदय होअील

अण्णूला हरिजन काम कितपत आवडतें? मी सिंधमधून पू बापूजी-बरोबर येथें आलीं आहे कदाचित् वर्ध्यापर्यंत बरोबर राहीन नक्की नाहीं.

बापूजी तेथें ७ दिवसाचा उपवास करणार आहेत, हें आपण वर्तमानपत्रात वाचलें असेलच सध्यां फार थकले आहेत. त्यात उपवास कसा झेपेल याची काळजी वाटते.

असहकार व सविनय कायदेभग पेटत नसल्यानेंळी कौन्सिलांत काम करणें अपरिहार्य होतें. कारण सर्वच रचनात्मक काम करूं शक्त नाहींत. कौन्सिलें स्वराज्यप्राप्तीच्या दृष्टीनें पोंचट, कुचकामाचीं असलीं तरी बारीकसारीक कामें त्याच्यामार्फत करून घेणें शक्य आहे

आम्ही अहमदाबाद सोडून विद्यापीठाला खेडेगावातून पसरविणार आहोंत कुमरी आश्रमाच्या बाबतींत सर्व प्रकारें शक्य ती सल्ला देण्यास मी तयार आहें. आता माझी तीच खरी उपयोगिता उरली आहे.

Socialist पक्ष आता अगदीं ऐनरंगात येणार. पण अनुभव घेऊन बापूजींच्या मार्गाकडेच परत फिरल्यावाचून गत्यतर नाहीं

दिवाकर आता पुढें काय करणार आहेत? ऑर्डिनन्सेस आहेत तोंवर वर्तमानपत्र चालविण्यांत अर्थ नाहीं.

पुंडलीकजींचा प्रवास सपला असेल, व ते आपल्या प्रिय कामाला—कुमरी आश्रमाच्या पुन:स्थापनेला लागले असतील खरोखर जर सगळें राष्ट्र रचनात्मक कार्य जोरानें करू लागेल तर सविनय भंग व जेल-भक्ती यांची जरूरच उरणार नाहीं.

येथें बापूजींना पाहाण्याला इतकी गर्दी होते कीं, लोकाना वेड लागलें आहे असेंच वाटावयास लागतें व्यवस्था ठेवणें दुरापास्त होतें व लोकांना काहींच वाटत नाहीं

चि मोहनला सप्रेम शुभाशीर्वाद आपल्या प्रकृतीला जपावें हे विज्ञापना

बालक
दत्तात्रेय

६८

आश्रम, वर्धा
१।८।३४

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें ता. ४-८ चें पत्र पोहोंचलें. पूज्य गंगाधररावांचें ६।८ चें पत्रहि आजच मिळालें. रामकृष्ण प्रभूंनीं आशेची निराशा केली तरी देखील निर्णयात्मक अुत्तर दिलें, याचें समाधान वाटलें. तुम्ही सर्व मंडळी मिळून अेखादा लायक मनुष्य सहज मिळवूं शकाल.

पुस्तकावरील अभिप्राय मला वाचावयास मिळाले नाहींत. मला त्याची पर्वा नाहीं. भाषेसंबंधीं टीका अवश्य होणार; आणि बिचाऱ्या गुजरातीवर त्याचें खापर फुटणार! ह्यापुढें भाषा सुधारण्याचा प्रयत्न करीन. पण जित्याची शैली ही खोडीप्रमाणेंच मेल्याशिवाय जात नाहीं, आणि शैलीचे दोष टाळण्यासाठीं म्हणून लवकर मरण्याची इच्छा नाहीं. अन्य रीतीनें मृत्यूचा अुमेदवार झालों आहें, ही गोष्ट निराळी.

'मंगल प्रभात' कानडी छापून तयार झालें होतें. त्याची अेक प्रत मीं पाहिली आहे, असें स्मरतें. पण बंगळूरकडील मंडळींना त्याची माहितीहि नाहीं. असें कां व्हावें? बंगळूरच्या रामचंद्रन्ना कांहीं प्रती पाठवून द्याव्या. त्यांचा पत्ता 'हरिजन' सेवासंघ असा असावा.

रामचंद्र वडवी कोणत्याहि कारणानें का होअीना, कांहीं दिवस कुमरीस अेकटा येअून राहिला तर तें अिष्टच आहे.

मनुष्यानें तीर्थयात्रेस जावें. पण तीर्थवासी होअून राहूं नये असें म्हणतात. आश्रमवासाची तीच गोष्ट आहे. तेव्हां जुन्या मंडळीस निरनिराळ्या खेड्यांमध्यें पेरण्याचा तुमचा विचार अुत्तम आहे. मी यथाकालीं तेथें येअीनच. कदाचित् निपाणीला ह्या खेपेला थोडा अधिक वेळ द्यावा लागेल.

मुळ्द्वाळला जो औषधोपचार चालू आहे तो हिंवतापाची साथ बंद झाल्यानंतरहि अल्प प्रमाणानें चालू ठेवाल, तर चांगलें होअील. अिग्रजी

आणि देशी वैद्यकाचे लोकसुलभ ग्रंथ गोळा करून त्यातील अुपयोगी माहिती निवडून काढून, वाचून, कामचलाअू वैद्य प्रत्येकानें बनलें पाहिजे मात्र त्या कामातच रगून जाअून अितर गोष्टी विसरून जाण्याची भीति असते, हें लक्षात ठेवावें

पूज्य बापूजींच्या अुपवासाचा आज दुसरा दिवस आहे. डॉक्टरनें काळीज कमजोर असल्याचें सागितलें आहे. पूर्वी कधींहि असें नव्हतें. पण चागला आराम मिळून प्रकृतीला फायदाच होअील, अशी आशा आहे. पुष्कळ दिवसांनीं त्याना आता खरा आराम मिळू लागला आहे

मला वाटतें, ह्यापुढें रचनात्मक कार्यपद्धतीमध्यें जो फेरफार करावयाचा, तो दृढपणें पण सर्वांना झेपेल अशा प्रकारचाच करावा सत पुरुष म्हणतात, त्याग करावयाचा तो 'शीतळ' असावा

पूज्य श्री गगाधरराव ह्या वयात अगदीं नव्या अुत्साहानें नवा कार्यक्रम अमलात आणण्यास तयार झाले आहेत, हीच अेक असाधारण गोष्ट आहे. श्री. दिवाकर ह्याच्याशीं तुम्हा मडळींचा घरोबा वाढला पाहिजे त्याना यत्किंचितहि परकेपणा वाटू नये कॉंग्रेसच्या सावळ्या गोंधळाला बापूजी अगदीं कटाळले आहेत पण कॉंग्रेस बापूजींना 'बाबा कबल' न्यायानें चिकटली आहे.

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

---

# ६९

श्री वर्धा

२३-८-३४

प्रिय पुंडलीकजी,

पाडुरग देशपाडेकडे पुस्तकाच्या प्रती तशाच पडून राहिल्या आहेत, त्या अगोदर खपावयास पाहिजे होत्या, असें मला वाटतें पण तो प्रश्न भेदू तेव्हा

पुन चवूं मीं विद्यापीठाचा भार डोक्यावरून अुतरून अेखाद्या खेडेगावात राहण्याचे ठरविलें आहे त्याप्रमाणें विद्यापीठ मंडळाकडे राजीनामाहि पाठवून दिला आहे पू श्री बापूजींच्या संमतीनें हें सर्व केलें आहे आता माझे निवृत्तीचे दिवस सुरू होतात निवृत्तीची प्रवृत्ति कदाचित् अल्पजीवी होअील किंवा मोठी व्यापक होअील, अीश्वर जाणे ! मला मात्र आता मोकळें वाटू लागलें आहे

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

---

## ७०

आश्रम, वर्धा,
१९-८-३४

प्रिय पुंडलीकजी,

मला अहमदाबादेस जाणें फार आवश्यक आहे. विद्यापीठामधील आणि गुजरातमधील सर्व संस्थांच्या ट्रस्टी मंडळांतील माझ्या जागेचा मी राजीनामा देणार आहें व ह्यापुढें कोठेंहि अधिकारारूढ न रहाता होअील ती सेवा करणार आहें कोठें तरी शहराजवळील खेडेगावांत केंद्र करून राहावें म्हणतों जर पैशाची सवड झाली तर मजजवळ राहू अिच्छिणाऱ्या तरुणाना थोडे दिवस जवळ घेअून ठेवून कामास लावून द्यावें, अशी कल्पना आहे. लेखन, वाचन व ग्रामसेवा हींच मुख्य कामें असतील

श्री रामकृष्ण प्रभूंचें पत्र आलें आहे तें ह्यासोबत पहावयास पाठवितों. चि सतू जर स्वत.च्या खर्चानें साबरमतीस गेला, तर तेथील आश्रमात ठेवण्याची व्यवस्था करीन निपाणीस त्याला ठेवण्याची भीड आता चालणार नाहीं सतूला ही शेवटची संधी देत आहें

रात्रीं २॥ वाजता चि० वाळ्याकडून तुलसीरामायण अैकलें व लगेच झोंप लागली त्याना शक्ति येण्यास अजून अेक महिना लागेल. त्यांनीं पुढील कार्यक्रम अजून नक्की केला नाहीं

पू गंगाधररावांच्या प्रकृतीसंबंधीं काळजी वाटते तुम्ही रोजच्या रोज पत्र लिहून समाचार कळविलात, हें चांगलें केलें त्यांच्या प्रकृतीला विशेष जपा त्यांच्या प्रोत्साहनाची आणि आशीर्वादाची मोठी स्मित आहे

पुण्याला आमची कल्पना स्पष्ट मांडण्याचा माझेकडून प्रयत्न करीनच महाराष्ट्राची अशी प्रत्यक्ष सेवा बुद्धीनें, शरीरश्रमानें किंवा पैशानें मीं काहींच केली नाहीं त्यामुळें कोरडा अुपदेश करण्यास फार संकोच वाटतो पण सर्व देशामध्यें जी नीति आवश्यक आहे, ती स्पष्टपणें मांडलीच पाहिजे व त्याप्रमाणें मार्डीनहि.

कॉंग्रेसमधील बुजबुजाट म्हणजे पुष्कळ दिवस तुंबलेला कचरा आहे तो जावयाला पुष्कळ वेळ लागेल आज कॉंग्रेसबाहेर राहून कॉंग्रेसला टेका देणें आणि रचनात्मक कार्यक्रमात सर्व शक्ति खर्च करणें, हाच कॉंग्रेसला वाचविण्याचा अेकमात्र अुपाय आहे

गीताधर्मावर जें काहीं लिहिलें आहे, तें भाअी डांगे याचे हातून लिहिलें आहे तें सुधारल्यानंतर तुमच्याकडे पाठवीन किंवा पुण्याला अथवा बेळगावला तुमच्या हातीं सोंपवून देअीन तें पुस्तकहि पूर्ण झालें, असें म्हणता येत नाहीं त्याचें प्रकाशन कुलकर्णी यांचेकडून किंवा औंधच्या सातवळेकराकडून करवावें, ह्याविषयीं मनाचा निश्चय केला नाहीं. 'प्रसाद' चें कानडी भाषांतर घाअीघाअीनें कसेंबसें होता कामा नये, हें पहालच

अेकदां अहमदाबादला जाअून सर्व गोष्टी व्यवस्थित रीतीनें नरहरभाअींच्या ताब्यांत सोंपवून सर्वांची सोय लावली म्हणजे मी मुक्त झालों पुढील कार्याच्या बाबतींत मी काहींच घाअी करणार नाहीं आजपर्यंत मिळालेल्या अनुभवांचा रवथ करून मगच पुढील काम हातीं घेअीन.

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

७१

मद्रास, हिंदीप्रचारक-सभा
Triplicane, Madras
१२-१२-३४

प्रिय पुंडलीकजी,

तुम्ही सनातन हिंदी प्रचारक आहांत, तेव्हां मला येथें प्रचारासाठीं आलेला पाहून तुम्हाला आनंदच होईल. या बाजूला महिना दीड महिना फिरण्याच्या संकल्पानें आलों आहें. सबंध दक्षिण पालथी घालणार आहें.

तुम्ही आतां काँग्रेसचे सभासद करण्याच्या कामाला कमर कसून लागलां असाल. त्यांतच अेक लहानसें हिंदी-काम तुम्हांवर सोंपवीत आहें. बनारसला 'पंडित' म्हणून अेक मासिक निघत असतें. त्यांना मजकडून धर्मविषयीं अेक लेख हवा आहे. त्यांचा धर्मांक मार्गशीर्ष पौर्णिमेला बाहेर पडणार आहे, असें ते लिहितात. अर्थात् माझा लेख अुशीरानें जाणार पण त्याची हरकत नाहीं. आतां स्वत: लेख लिहिण्यास मला वेळ नाहीं; तेव्हां 'धर्मसंस्करण' या प्रकरणांपैकीं तुम्हांला वाटतील तितक्या कंडिका (paragraphs) सरळ हिंदींत अनुवाद करून पाठवून द्या. अनुवादकाचें नांव देखील आलेंच पाहिजे. अशा रीतीनें हिंदी क्षेत्रांत तुमचा आतां प्रवेश व्हावा, अशी अिच्छा आहे. हें काम तावडतोब कराल तरच होण्याजोग आहे.

बेळगुंदीच्या कार्याचे ट्रस्टी तुम्ही आहांत. तुम्ही श्रीरंग कामतशीं मसलत करून अेखादी सूचना गंगाधररावांच्यापुढें ठेवलीत तर ती लवकर अंमलांत येअील. मुरलीधर घाटेसाठीं पत्र यासोबत आहे तें त्यांना द्याल.

ट्रस्टचे कागद लवकर रजिस्टर झाले पाहिजेत, याचीहि निकड तुम्हींच लावली पाहिजे.

कुमरी आश्रमापैकीं बरीचशी मंडळी निरनिराळ्या खेडेगांवीं जाअून राहणार होती, त्याचें काय झालें? अेव्हांना दोनतीन मंडळी तरी जाअून

राहिली पाहिजेत. रामचंद्र वढवीची प्रकृति हा तुमच्या आमच्या चिंतेचा सनातन विषय आहे. त्याचेविषयीं मला लिहालच. दिवाकरानीं प्रस्तावना लिहून दिली का?

मंगल प्रभातची नवीन आवृत्ति अुत्तम तऱ्हेनें निघाली पाहिजे. तिचेसाठीं अेक विस्तृत प्रस्तावना देखील लिहिण्याची आवश्यकता मला भासत आहे.

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

## ७२

हिंदी-प्रचारक-सभा,
Triplicane, Madras
१५-१२-३४

प्रिय पुंडलीकजी,

ता ११ चें आणि १२ चें अशीं तुमचीं दोन कार्डे पोचलीं ५६ पुस्तकें तुमचेकडे आलीं हीच गनीमत. अेवढीं पुस्तकें म्हणजे तुमच्या अुत्साहाला ' शाकाय वा स्यात् लवणाय वा स्यात् " !

मी अुद्यां येथून निघून १० दिवसासाठीं आंध्र प्रांतांत दौरा करणार आहें. पुढें २५ ते ३१ मद्रासमध्यें राहून तामीळनाडकडे आणि केरळकडे फिरणार आहें. पुढील तारखा ठरताच कळवितों. वळ्ळागीचे सुब्रह्मण्यम् वर्ध्याला भेटले होते, त्यांनीं आमंत्रण दिलें आहे. माझी अिच्छा कर्नाटकमध्यें हिंदी प्रचारासाठीं फिरावें अशी आहे. तुम्हीं काँग्रेसचे मेंबर्स करावयास हिंडणार असाल, त्याच दिवसात गगाधररावहि दौरा काढतील तर चांगलें होअील. कोठें कोठें दिवाकरानीं देखील सामील व्हावें.

आता युद्ध तहकूब राहून रचनात्मक कार्यक्रमाचें युग सुरू झालें आहे. अशा वेळीं थोडे दौरे काढून लोकाना निरनिराळ्या कामाला लावलें पाहिजे.

पू. श्री. गंगाधरराव मुंबअीहून आतां परत आले असले पाहिजेत. त्यांना विचारून काहींतरी ठरवावें.

कालच्या हिंदूमध्यें खानसाहेबांचें निवेदन वाचलें. सरकारला आतां पेंच पडणार खरा. सत्यपालच्या निवेदनांत देखील तशीच बाजू आहे. संपूर्ण सत्य आणि हृदयाचा मोकळेपणा हीं असलीं म्हणजे विरुद्ध पक्षाला सरळ होण्यावांचून गत्यंतरच रहात नाहीं.

मला वाटतें, कर्नाटकमध्यें हिंदी प्रचाराचें काम विशेष चांगल्या पायावर झालें पाहिजे. हल्लीं मंगळूरचें केंद्र सर्वांत अुत्तम चाललें आहे. बंगलोर, अंकोला, म्हैसूर, वगैरे ठिकाणींहि चांगलीं आहेत. बळ्ळारीच्या, हुबळीच्या बाजूला पुष्कळ काम करण्यासारखें आहे. थोड्याशा प्रयत्नानें हा सर्व विभाग मजबूत करतां येअील. गंगाधररावांची सल्ला घेअून मला कळवावें.

मुरलीधर घाटेविषयीं, बेळगुंदीविषयीं काय ठरलें तें कळवावें. मला वाटतें, मेलेल्या गुरांची चामडीं काढून तीं कमावण्याचें काम अेखाद्या हरिजन विद्यार्थ्यालाच शिकविलें पाहिजे. स्थानिक पद्धतीमध्यें वाकबगार झालेल्या विद्यार्थ्यालाच अन्यत्र शिकविण्यासाठीं पाठविणें योग्य होअील.

तूर्त अहमदाबाद किंवा नवसारी येथील हरिजन आश्रमांतून कमावलेलीं मृतचर्में मागवून चप्पल, पाकिटें, वगैरे पदार्थ तयार करण्याचा कारखाना शहापूर–बेळगांवकडेच काढावा. मुंबअीला Bombay Humanitarian League ऑफ बझारमध्यें चामड्याचा माल विकते. रूपनारायणसिंग म्हणून अेक सज्जन गृहस्थ हें काम चालवीत असतात. त्यांच्याशीं पत्रव्यवहार करून कमावलेलीं मृतचर्में स्वस्त भावानें मिळालीं तर मागवावींत, आणि पदार्थ तयार करून विकावेत. गिऱ्हाअीकें खात्रीनें मिळतील. चि. संतूला साबरमतीला ठेवला आहे. तो तेथें शिकून तयार झाला म्हणजे त्यालाहि बेळगांवास आणतां येअील. पुढें हा सर्व कारखाना बेळगुंदीस नेतां येअील.

बेळगुंदीचे ट्रस्ट डीडची नोंदणी लवकर करून घेतलेली बरी. नोंदणी होतांच मला कळवावें.

तुमच्याकडे अिंग्रजी हरिजन येत असेलच.

शहापूरचे रेगे बंधू कांहीं उपयोगी पडतात का ?

त्याना कशात तरी गुतविलें पाहिजे शहापूरच्या लोकाकडूनच वर्गणी गोळा करून अेखाद्या चागल्या कामाला सुरुवात केली पाहिजे. लोकाना पैसे देण्याची संवय लाविली पाहिजे नाहींतर लोक गजून जातात

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

## ७३

मगनवाडी वर्धा,

१५-३-३५

प्रिय पुंडलीकजी,

वा रे वा ! म्हणे अकोल्याला जाअून हिंदीची मौखिक परीक्षा घ्यायला स्वयभू हिंदी प्रचारक पुडलीकजींना मे महिन्याच्या पहिल्या आठवड्यात दोन दिवस मिळत नाहींत ! हें काहीं चालावयाचें नाहीं आयतें मोटारभाडें मिळतें, परीक्षक म्हणून मिरवता येतें, काकाना आणि आण्णांना अेकाच वेळीं खूष करता येतं आणि कर्नाटकातील म्होरक्याला अकोल्याशीं सबध वाढविता येतो शर्माजी ऊर्फ आण्णा मद्रासहून येथें आले आहेत त्यानीं तुमचें पत्र मला दाखविलें मी त्याना गुजराती म्हण सागितली. " अुदार खोगीर चढविताना त्यानें कुरकुर केली नाहीं, असें कधींच झालें नाहीं " खोगीर माझ्या हातीं या म्हणजे मी चढवून देतों

आता हें कार्ड पहाताच इदूरला २० अेप्रिलच्या आसपास मला मिळेल, असें स्वीकृतिपत्र पाठवून द्या C/o " महात्मा गाधी " हा सुरक्षित पत्ता माझ्या नावानेंच लिफाफा लिहा

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

## ७४

मगनवाडी, वर्धा

रामनवमी

१२-४-३५

प्रिय पुंडलीकजी,

तुम्ही जर असे पुन. पुन. आजारी पडू लागला, तर तुमच्याशीं गडी फू करावी लागेल ! माझ्या हक्कामार्गे मी हल्लीं आजारी पडत नाहीं, याचा तुम्ही असा फायदा घेणें तुम्हाला शोभत नाहीं आजारी पडणें हा कांहीं तुमचा स्वधर्म नव्हे ' परधर्मो भयावह !'

गोव्यातील ( सावर्डे ? ) श्री करगुप्पीकर यांनीं दोन हरिजन विद्यार्थी माझ्याकडे सोंपविले दुसरी कांहीं सोय नसल्यामुळें मीं त्याना निपाणीला ठेवलें पण शक्य झाल्यास त्यांना मुरलीधर घाटगेकडे ठेवावें अशी माझी अिच्छा आहे पण तसें केल्यानें मुरलीधरला गळ्यात लोढणें पडल्यासारखें वाटेल, तर माझी अिच्छा मला दाबली पाहिजे जर मुरलीधरची पायपीट कमी झाली असली, तर या दोघानीं त्याच्याबरोबर राहावें हें चागलें सध्या मी निपाणीच्या बोर्डिंगला दरमहा १० रु भरीत आहें तेव्हा तुम्हाला जसें योग्य वाटेल तशी सल्ला मला द्या मुरलीधरचा विचार अर्थात् घ्यालच आणि वाटल्यास नरहरी जोशींकडून माहिती मिळवालच

१४-४-३५

तुम्ही इंदूरला न आला तरी हिंदी-प्रचाराचें काम तुम्हाला करावें लागणारच आहे कानडी भाषेंतील अुत्तम पुस्तकें नागरी लिपींत छापण्याचें काम कानडी लोकांकडून करून घ्यावयाचें आहे हें काम कदाचित् तुम्हाला झेपावयाचें नाहीं कारण तुम्ही अजून १०० टक्के आणि शकातीत कच्छदिग झाला नाहीं आहात अेखादा मुसलमान आर्यसमाजी झाला आणि म्हणू लागला कीं, मी मूळचा आर्य होतों, अेकदोन पिढ्या बाटून मुसलमान

झालों, तर त्याला आर्यसमाजात घेतात खरें, पण त्याला कोणी चतुर्दिशी आपली मुलगी देत नाहीं मुलीला घेऊन पुन. मुसलमान झाला, तर त्याचें काय घ्या? अेक मुलगी मात्र हातची जावयाची! अशा जावयाचा विश्वास न केलेला बरा तुम्ही नागरी प्रचार करू लागला म्हणजे कानडीवाल्याना असेंच वाटावयाचें! त्यापेक्षां दिवाकराच्या मार्फतच हें काम केलेलें बरें दिवाकर, हुकेरीकर, भारद्वाज, कौजलगी, बडवी, वगैरे अभिमानी मंडळींच्या समजूतदारपणानेंच नागरी प्रचार व्हावयाचा आहे

राष्ट्रभाषा हिंदीसाठीं नागरी–अुर्दूचा झगडा किंवा 'समट' चालू राहू द्या, त्याला अिलाज नाही कदाचित् "तुला ना मला, घाल कुत्र्याला," या न्यायानें रोमन लिपीहि स्वीकारीत बाकींच्या प्रांतीय भाषा "काश्मिरी, पहाडी, नेपाळी, असामिया, बिहारी, मैथिली, बंगाली, ओरिया, आंध्र (तेलगु), तामिळ, मल्याळी, तुळु, कुर्गी, कानडी, कोंकणी, मराठी, गुजराती, कच्छी, सिंधी, मारवाडी, पंजाबी," या सर्व भाषा मूळच्या स्वतंत्र असोत, नसोत, आज संस्कृताच्या मुली म्हणून नांदत आहेत त्याच्या शब्दभांडारात निम्याहून अधिक शब्द संस्कृतपासून घेतलेले तत्सम, तद्भव आहेत नवीन शब्द तयार करताना संस्कृताचा आश्रय घेतला जातो या सर्वांची लिपिमाला भिन्न असली तरी वर्णमाला जवळजवळ अेकच आहे आणि विशेष हा कीं, ही भाषा बोलणारे सर्वच संस्कृतप्राकृतमधील धर्मपुस्तकाना आपली आदरणीय पैतृक संपत्ति असें मानतात या सर्व भाषा हिंदु संस्कृतीच्या आश्रित तेव्हा निदान या सर्वांचा कौटुंबिक पोषाख नागरी लिपीचाच असावा या सर्वांचें नागरी–संगठन होणें स्वाभाविक आहे, आवश्यक आहे आणि शक्तिकर आहे जर रोमन लिपीच्या हल्लयापुढें टिकावयाचें असेल तर या सर्व प्रांतीय भाषानीं जवळ जवळ आलें पाहिजे नागरी पोषाख चढविल्यावाचून आपण किती समान आहोंत, हें कोणाच्याच लक्षात येणार नाहीं प्रांतीय संस्कृति आम्ही मारू अिच्छित नाहीं पण त्याची आत्मघाती कूपमंडूकता दूर करू अिच्छितों या सर्वांना प्रांतीयतेपुढें संस्कृत–संस्कृतीचा आदरहि सोडून द्यावासा वाटतो, हें संकट टाळावयाचें आहे आज लोक मानोत किंवा न मानोत, ही आवश्यक नीति त्यांच्यापुढें मांडलीच पाहिजे

साधल्यास हा प्रश्न इद्रूला खूप जोगनें माडायचा आहे.

गाधी–वाङ्मय छापविण्याच्या बाबतींत तुम्हाला योग्य वाटेल तें करालच. धारवाड शिक्षण–प्रसारक–मडळाचा अुद्देश, त्याची आजवरची कामगिरी आणि परपरा कशी आहे, हें मला माहीत नाहीं हुबळीचे सिद्धारूढ स्वामी काहीं राजकीय प्राणी नव्हते पण त्यानीं आपली अुपनिषदावरील कानडी टीका नागरी लिपीमध्यें छापवून घेतली होती, हें तुम्हाला ठाअूक नसेल. 'वेव्हगान समाचार' प्रेसमधील किता तरी पुस्तकें पूर्वीं कानडी भाषा आणि नागरी अक्षरें अशीं छापलीं जात त्या काळीं ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद नव्हता, आणि कानडी–मराठी वादहि नव्हता त्या वेळीं सस्कृतचा, सस्कृतीचा, द्वैत–अद्वैताचा आणि हिंदुधर्माचा अभिमान होता आज आपल्या देशात विभक्त आणि सकुचित होण्याचीं जीं जीं तत्त्वें सापडतील तीं तीं काहीं लोकाकडून अगदीं भुकावलेल्याप्रमाणें पकडलीं जातात, पुरस्कारलीं जातात

गाधी–वाङ्मय छापविण्याच्या बाबतींत काहीं गोष्टी नक्की असाव्यात कागद स्वदेशी आणि चागला असावा टाअिप अति बारीक किंवा मोठा नसावा नवा नसला तरी स्वच्छ आणि ताजा असावा झिजून गेलेला नसावा बायडिंग मजबूत असावें, पण बायडिंगच्या पायीं हवातसा खर्च करू नये कापडी बायडिंग नसावें किंमतीचें धोरण अुभयपक्षीं मिळून ठरावें लेखकाच्या सस्थेला शभर प्रती भेट म्हणून याव्यात भाषातरासाठीं काहींहि वेतन मागू नये भाषातरात शाब्दिक सुधारणा करण्याची मोकळीक प्रसारमडळाला असावी पण सक्षेप किंवा विस्तार करण्याच्या बाबतींत भाषातरकाराची सल्ला घ्यावी तीव्र मतभेद अुत्पन्न होअील तेथें प्रथमपासून मुकर केलेल्या कोणा तिऱ्हाअिताकडे प्रकरण सोंपविलें जावें आणि त्याचा निर्णय शेवटचा समजला जावा महात्मा गाधींच्या लिखाणात आवडनिवड करू नये म्हणजे राजकीय वाङ्मय छापू, धार्मिक छापू, पण अस्पृश्यता निवारण किंवा खादी किंवा आहार शास्त्रावरील लेखाना तितकेंच महत्त्व देणार नाहीं, असें म्हणता कामा नये

गाधी–वाङ्मयात महादेवभाअी, किशोरलालभाअी, मी, बालजीभाअी, प्यारेलाल, चद्रशकर, जुगतरामभाअी, वगैरेंचें लिखाण देखील घेतां येअील.

थोडक्यांत सांगायाचें म्हणजे 'नवजीवन' प्रकाशन मंदिर जें छापत आहे किंवा छापील तें सामान्यपणें गांधी-वाङ्मय म्हणता येईल

पण अशा प्रकारची व्याख्या किंवा समजूत पुष्कळांना पटणार नाहीं तेव्हा अुभयताना मान्य अशा कोणी तीन प्रतिष्ठित लोकांचें अेक निर्णायक मंडळ मुक्रर केलेलें बरें

सत्य, अहिंसा, अस्पृश्यतानिवारण, जातींमधील आणि धर्मांमधील सलोखा आणि हिंदी, तसेंच खादी, या बाबतींत ज्यांचे विचार गांधींशीं चांगले जुळत नसतील त्यांना या निर्णय-मंडळांत घेअू नये

आधुनिक पाश्चात्य वाङ्मय कुमरींत येणार आहे किंवा नाहीं, हा प्रश्न नाहीं. स्वदेशांतील आणि विशेषत. गांधींच्या वाङ्मयाला आपण आश्रय का देत नसतों, हा प्रश्न होता

जर बरें होण्याची तुम्हाला घाअी नसेल तर अवळपवळ पत्रें लिहिण्याची ही संधी आहे, ती सोडू नका दिवाकर इदूरला येणार आहेत का?

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

ता क -बंगळूरचे हिंदी-प्रेमी तरुण वकील निट्टूर श्रीनिवासराव यांनी अेक 'सत्यशोधन-साहित्य मंदिर' काढलें आहे त्यांतहि आत्मकथे-सारखें गांधी-वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे तुम्ही त्यांच्याशीं वाटल्यास पत्र-व्यवहार करा

समजा, गांधींनीं राष्ट्रापुढं विनंती केली कीं, माझें सर्व साहित्य प्रांतीय भाषेंत छापणायानें नागरींतच छापावें, तर तुम्ही मंडळी त्यांच्या वचनाला मान द्याल का?

धृतराष्ट्राला मात्र डोळे मिळाल्यासारखे होणार आणि तेंहि अनायासें!

## ७५

मगनवाडी, वर्धा

१७-५-३५

प्रिय पुंडलीकजी,

हिंदी साहित्य-संमेलन ही कांहीं नवी संस्था नाहीं कीं ती ध्येयवादानें चालेल. कित्येक लोकांची तीमध्यें मिरास जमलेली आहे. आणि नवीन लोक तीमध्यें स्वतःचें घोडें दामटूं पहात आहेत. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें नवें मासिक माझें नाहीं. श्री कन्हैयालाल मुनशी कांहीं हिंदी-लेखकांच्या मदतीनें काढूं पहात आहेत. हजार वर्गणीदार मिळविले तर पू. बापूजी चालवूं देतील. यांत बापूजी प्रमुख आहेत, म्हणून मला यांत रस आहे, अेवढेंच. दिवाकर संपादक-मंडळांत राहून पुष्कळ काम करूं शकतील.

मीं दिवाकरांना कर्नाटकांतील हिंदी-प्रचारकार्यात पुढाकार घेण्याचें सुचविलें. पण त्यांचे पत्रावरून दिसतें कीं, त्यांना वाटतें मीच (काका) कर्नाटकांत हिंदी-प्रचाराचें काम करूं अिच्छित आहे आणि त्यांची मदत मागत आहे. अजून तरी मनानें देखील मीं कर्नाटक माझें कार्यक्षेत्र मानलें नाही. दक्षिणेकडील चारहि प्रांतांत, सोळा वर्षे झालीं, हिंदी-प्रचार होअून राहिला आहे. आतां हे चारहि प्रांत प्रान्तीय स्वायत्तता मागूं पहात आहेत. कर्नाटक-मध्यें ही हुरहुरी आहे. पण कोठेंच अैक्य दिसत नाहीं. अुत्साही लोकांत ध्येय आणि पोंच नाहीं, जबाबदारी नाहीं आणि जबाबदार लोकांत अुत्साह नाहीं. स्वतःच्या डोळ्यादेखत प्रांताचे तुकडे झालेले पहात आहेत ! निदान निष्ठावान् लोकांचा संघ मजबूत करून विशिष्ट विभाग तरी ताब्यांत ठेवले पाहिजेत. हातीं असलेला पैसा सद्व्ययपणानें खर्चला पाहिजे. पैसा संपल्यावर पुढें काय होअील अशी नास्तिकता मनांत बाळगावयास नको. काटकसरीनें पैसा पेरला तर लोकांमध्यें सार्वजनिक कामाची गोडी अुत्पन्न होते. गांधीजींचें फकीरी राजकारण कर्नाटकांत रुजलें पाहिजे. तुम्ही काँग्रेसचें काम—सभासद नोंदण्याचें काम—केलेंत तें अुत्तम झालें. आतां विशिष्ट मताच्या तुम्ही

लोकानी परस्पर सहकारान काँग्रेसचें तंत्र स्वत:च्या ताब्यात ठेवलं पाहिजे. वल्लभभाअी पहा, कसे बोरसदकडे जीव तोडून लोकसेवा करीत आहेत ! प्रतिपक्षाला मात करण्याचा अेकमात्र अुपाय हा आहे कीं, स्वकीयाना आणि अनुयायाना अुचलून धरलें पाहिजे त्याना विश्वास वाटेल अशी मदत केली पाहिजे मुनअीचा पैसा मागून आणून कारवार जिल्ह्यात ओतल्यानें भागणार नाहीं, हें अेव्हाना समजलें पाहिजे त्यानीं सर्वत्र हिंडून ब्राह्मणेतर, लिंगायत, वगैरे सर्वांची सेवा केली पाहिजे हिंदीचें काम लहानसहान नाहीं पण त्यात आत्मविश्वासानें पडलें पाहिजे महात्मा गांधी देतील तेवढे पैसे आजच्या लोकात वाटून टाकू, अशा वृत्तीनें कामें व्हावयाचीं नाहींत, स्वत: राबलें पाहिजे, स्वत. पैसे गोळा केले पाहिजेत, फकीरीनें राहिलें पाहिजे आणि पोटातील आत्म-अविश्वास खरोखर काढून टाकला पाहिजे.

मंगळूरच्या परिषदेपासून सर्वांनींच बोध घेतला पाहिजे आणि खरोखरच जेवढा भाग आपल्या ताब्यात अुरला असेल तेवढा मजबूत केला पाहिजे

तुम्ही स्वत: हिंदी-प्रचाराच्या कामात पडणार आहात किंवा नाहीं ? पडणार असाल, तर कर्नाटकाच्या स्वायत्त प्रांतिक संघटनेंत तुम्ही असलें पाहिजे बंगळूरच्या सभेंत दिवाकर आले नाहींत, पण त्यानीं आशीर्वाद मात्र पाठविला आता तुम्हाला बंगळूरच्या मंडळाच्या हाताखालीं राहून काम केलें पाहिजे निराळी मदत मागाल तर आम्ही (मद्रासनें) कशी द्यावी ? संयुक्त कर्नाटक आम्ही तोडू पाहातों, असा याचा अर्थ होअील तुमचीं भांडणें आमच्या हातीं भाडू नका तुम्हाला अेकोप्यानें राहता येत नाहीं, वेगळें फुटण्याची हिंमत नाहीं, यामुळे व्यवस्थाचे मात्र चागलेच हाल होतात व सरतेशेवटीं वाटतें कीं, जे कोणी पुढें पुढें करून अितराना बुली करतात, त्याच्याच हातात भात खरोखर आहे तेव्हा त्यानाच प्रतिष्ठा दिल्यानें त्याच्यामध्यें बरें वाअीट पुढारीपण येअील

आता तुमच्या पुस्तकाविषयीं त्याचें पुनर्मुद्रण व्हावें, कानडीमध्यें भाषांतर व्हावें, असें मलाहि वाटतें पण पुनर्मुद्रणाला मदत करावयाची ती महाराष्ट्र-हिंदी-प्रचार-संघानें करावयाची असा सर आहे काय ? पुणें, सोलापूर,

मुंबअी, वगैरे ठिकाणी थोडेंस काम होतें पुण्याला तुमचे सावरकरी वैशंपायन हिंदी-प्रचार करतात महाराष्ट्र-संघटन झालें तर त्यात तुम्ही असाल का? गांधींना अेक लक्ष अजून मिळाले नाहीत आणि मिळतील तेव्हा ते दक्षिण-भारत-हिंदी-प्रचार-सभेला मिळतील त्यांतून महाराष्ट्रानें आशा करू नये महाराष्ट्रानें स्वत हिंदी-प्रचार-संघटन केलें आणि काहीं पैसे जमविले तर मग बाहेर जाअून मागणें शोभेल महाराष्ट्रात गांधींच्या रचनात्मक कार्य-क्रमाला वाहून घेतलेली धडाडीची मडळी कोण आहेत? पू गंगाधरराव जर शकरराव देवाच्यामध्यें हिंदीविषयीं अुत्साह अुत्पन्न करतील, तर तुम्हाला अितराच्या मार्गे लागावें लागणार नाहीं वैशंपायनाची सार्वजनिक कामा-विषयींची निष्ठा व त्याची चिकाटी हीं मला फार आवडतात ते गांधीमताचे विरुद्ध आहेत म्हणून त्याचा आत्मेनाअीक हिंदी-प्रचार मी विसरणार नाहीं. पण तुमचें त्याचें जुळेल का? माझें जळू शकतें

रचनात्मक कार्यक्रम हाच काय तो स्वराज्याला पोचविणारा खरा रस्ता आहे, असा ज्याचा विश्वास आहे, ते लोक अशा झोंपा का काढतात? याचेंच मला राअीट वाटतें.

अजून देखील मला वाटतें कीं, दिवाकराना अुत्साहित करून त्यांचेबरोबर तुम्हीं कर्नाटकात सर्वत्र हिंडावें आणि पक्षपात-रहित सर्वांशीं दोस्ती करावी डिवाकरासारखा सर्वांना आदर आहे ते कदाचित् हिंदीच्या बाबतींत प्रांताला अेक करू शकतील तुमची अेकटयाची कोठेंच डाळ शिजणार नाहीं तुम्ही पुष्कळशी सेवा कराल, तेव्हाच कर्नाटकी लोक तुम्हाला आपला म्हणतील केशवराव गोखल्याच्या पद्धतीनें काम कराल, तर लवकर पुढें सरकाल पण ती पद्धत तुमच्या हातात नाहीं

मी कळकळीनें लिहितों तें कडकपणाचें किंवा दोषदृष्टीचें आहे, असें मानूं नका

बेळगुंदीच्या कामाला अेक प्रकारें सुरुवात झाली, याचा आनंद वाटतो कत्तुलपती घेतल्या हें चांगलें केलें वसूल करण्याचें काम मुरली सारख्या सौम्य, सात्त्विक मनुष्याच्या हातून होअील किंवा काय, याचा विचार करालच वसूल मुरलीधरच्या हाती यावा हें योग्य आहे, पण वसूल करण्यात

तुम्हा कोणाची मदत असावी, हें बरें. बेळगुंदीमध्यें केवळ हरिजनांनाच मदत करावयाची आहे असें नाहीं. हरिजन–सेवा प्रधान गणून सर्वच गरीब-गुरिबांची सेवा झाली पाहिजे.

बेळगुंदींतील आमचें घर चि. शंकरनें सट्टुप्पाला विकलें; पण त्याचे सर्व पैसे वसूल झाले नाहींत. पैशासाठीं तगादा लावला पाहिजे. मीं असें अैकलें आहे कीं, सट्टुप्पा थोडीशी बूड सोसून देखील तें घर परत द्यावयास तयार आहे. तसें झालें तर हरिजन आश्रमाला गांवाच्या अगदीं मध्यावर अुत्तम वस्तींत चांगलें घर मिळेल. मुरलीधर आणि त्याचे विद्यार्थी यांची राहण्याची चांगली सोय होअील. गांवांतील ब्राह्मणेतर मुलांना हरिजनांजवळ बसवून फुकट शिकवितां येअील. ब्राह्मण मुलें आलीं तर अवश्य घ्यावींत; पण त्यांचेकडून अगदीं थोडी का होअीना पण फीही घेतली पाहिजे. घराच्या व्यवहाराच्या बाबतींत चि. शंकरला पत्र लिहून सगळी माहिती मिळवा. शंकर आणि बाळ हे सध्यां अेकत्र राहतात. त्यांचा पत्ता —हंसराज प्रेमजी ब्लॉक्स्, मुंबअी, असा आहे. जमीन आणि कार्यकर्ता –मुरलीधर यांना आम्हीं दिलें आहे. यासाठीं आमच्या अभिप्रायाला अधिक मान तुम्ही देतां कामा नये. तसें केल्यास आमच्यावरचें ओझें वाढेल. माझी सूचना अेखाद्या तटस्थ हितैषींची सूचना म्हणूनच अैकावी.

हुदलीमध्यें हरिजन वस्तीमध्यें विहीर बांधवणार, हें फारच अुत्तम आहे. पण ती कोठें बांधणार ? जर त्या खळग्यांत बांधणार असाल तर पाण्याच्या लोंढ्यानें पडून जाण्याची भीति आहे. हरिजनांना जवळ पडेल, पाणी खोल असणार नाहीं, पावसाळ्यांत विहिरीजवळ जाणें हरिजनांना कठिण वाटणार नाहीं, अितक्या गोष्टी तुम्ही पाहिल्या असतीलच. हरिजन वस्ती वाढल्यास आणि ती वाढलीच पाहिजे, तिला वाढण्यास अवकाश मिळेल अितकी जमीन-हि हरिजनांसाठीं राखून ठेवली पाहिजे. हरिजन–विहिरीच्या आसपास पाणी सांड होणार नाहीं, असा अुंचवटा ठेवालच. ‘ हिंडलग्याच्या प्रसादा ” नें विहीर पास केली पाहिजे.

काकाचा<br>
सप्रेम वंदे मातरम्

७६

मगनवाडी, वर्धा

२३-५-३५

प्रिय पुंडलीकजी,

तुमचें ता. २० चें पत्र पोहोचलें. अशीं भरभर पत्रें लिहूं लागलों तर पोस्टाची चैन आहे.

तुम्ही इंदूरला आलां नाहींत ही पहिली चूक. आतां हिंदीसाठीं तुमच्या जिल्ह्यांत देखील फिरावयास नाहीं म्हणतां, ही दुसरी चूक. तुम्ही किंवा दिवाकर यांनीं प्रत्यक्ष नागरीप्रचार करावा, असें मी म्हणत नाहीं. हलाहल विष प्यावयास नीलकंठच हवे असतात. पण तुम्ही हिंदी-प्रचारासाठीं दिवाकरांना आग्रहानें बोलावून निदान बेळगांव जिल्ह्यांत हिंडवा. कानडी-साठीं नागरीप्रचाराचा ग्रहि काढूं नका. कानडीवर यथेच्छ भर द्या. दिवाकरांना अुत्साह असो वा नसो, तुमच्या जिल्ह्यांत त्यांना खेंचून आणा.

महाराष्ट्रांत जर कांहीं निमित्तानें जाणें झालेंच, तर हिंदीप्रचार केल्या-वांचून राहूं नका. काँग्रेस-कामासाठीं हिंडणार आहांच. हिंदीप्रचार हें काँग्रेसचें काम आहे. 'कानडी हिंदी शिक्षका'विषयीं मीं आण्णांना लिहिलें आहेच. कानडी अनुवाद कोण करणार? कोणीहि करो; पण 'विश्व-कर्नाटक'च्या संपादकासारख्या राष्ट्रीय मताच्या साहित्यसेवकाची प्रस्तावना घ्या. सिद्धनाथपंत म्हणून अेक तरतरीत कानडी हिंदी-प्रचारक बंगलोरमध्यें काम करतो. महत्त्वाकांक्षा तृप्त न झाल्यानें थोडासा असंतुष्ट आहे. त्याला जर आपलासा कराल, तर त्याच्या हातून पुष्कळसें कार्य होअील. तुम्हीं वणवण हिंडावें, असें माझें म्हणणें नाहीं. पण दर वर्षी निदान अेकदां सर्व कर्नाटकांत मुक्काम्यानें हिंडून यावें. सर्व कार्यकर्त्यांशीं गोडपणानें संबंध वाढवावेत, आणि खालीं मान घालून आपलें काम करीत राहावें. अशा प्रवासा-साठीं गंगाधररावांनीं तुम्हाला मदत केलीच पाहिजे. याळगीकडून देखील

तुम्हाला पैसे घेतां आले पाहिजेत. सर्व रचनात्मक कार्यक्रमांत तुमची मंडळी नसली तर कसें चालावें ? तुम्ही तुमचीं व्यक्तिगत भांडणें भांडूं पाहातां, असें मीं म्हटलें नव्हतें. पण कर्नाटकांत आज जीं भांडणें आहेत, त्यांचा स्पर्श तुमच्यामुळें, तुमच्या कार्यामुळें आम्हां त्रयस्थांना होऊं नये, अेवढेंच माझें म्हणणें होतें. दिवाकर हिंदीप्रचाराला अनुकूल आहेतच. ते कानडी लिपी सोडावयास तयार होणार नाहींत; पण नागरी लिपींमध्यें मधून मधून कानडी लेख आले, तर त्यांना तें आवडेलच. या दृष्टीनेंच त्यांच्या वृत्तीकडे पहा, म्हणजे त्यांची अधिकाधिक सेवा आपल्याला लाभेल.

...ची पद्धत अनुकरणासाठीं मीं तुम्हाला सुचविली नव्हती. तुमचें धोरण मला पसंत आहे. शेवटीं तेंच सफळ होणार.

तुम्ही आजवर सेवक म्हणून राहिलां आहांत, आतां जरा शिष्ट बना. अहंमन्य बनण्याची जरूर नाहीं, व तुम्ही कधीं बनणार नाहीं, हें मला ठाअूक आहे. पण अितक्या वर्षांच्या सेवेनंतर अधिकार-युक्त वाणीनें बोलत चला.

*हुदलीचें काम हाच तुमचा किल्ला आहे. तो अधिकाधिक बळकट करून* सर्व कर्नाटकांत काय चाललें आहे, अिकडे लक्ष दिलेंच पाहिजे.

पू. गंगाधररावांची सहानुभूति अच्युतराव पटवर्धनांच्या बाजूला आहे, तरी वर्किंग कमिटींत असल्यानें त्यांनाच त्या पक्षाला विरोध करावा लागत आहे.

यापुढें लांब लांब पत्रें लिहूं शकणार नाहीं.

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

---

## ७७

ॐ

वर्धा
२४-१२-३५

प्रिय पुंडलीकजी,

*मी आज अिंदूरला जात आहें. मराठी साहित्य-संमेलनांत हिंदीचा प्रति*निधि म्हणून जात आहें ! ता. २८ ला परत येअीन. २८ ते ३१ येथें

असणार. पुढें भुसावळ, जळगांव, मुंबअी (पाली) व अहमदाबाद, असा अेक महिना जाअील.

वेळगुंदीचा रिपोर्ट परत पाठवीत आहें. वेळगुंदीचें अुत्पन्न कां घटलें, समजत नाहीं. पूर्वी रोख २०० रुपये होत असत, शेतसारा देअून. असो. मुरलीधरला आतां तावडतोब अेक झोंपडी किंवा घर बांधून दिलें पाहिजे. जर त्यांनीं वेळगुंदीलाच केंद्र काढण्याचें ठरविलें तर त्यांना रहाण्यासाठीं व वर्ग चालविण्यासाठीं अेक प्रशस्त जागा बांधून द्यावी. मजकडून दोनशें रुपये या कामीं तावडतोब मिळतील. बाकीचे तेथून गोळा करावे. पू. गंगाधररावांचा व शिरगांवकरांचा अभिप्राय विचारावा. मुरलीधरला कांहीं पुस्तकेंहि पाठवीन.

तुम्ही दक्षिणामूर्ति विद्यार्थी-भवन, भावनगर, काठियावाड, या पत्त्यावर पत्र लिहून त्यांचें 'वार्तानुं शास्त्र' मागवून घ्या. त्यांत तुम्हाला बरीच माहिती मिळेल. त्यांची वसंतमालाहि चांगली आहे. मजजवळ असलेलीं पुस्तकें मी पाठवीन.

जर तुम्ही साक्षरता-प्रकाशन कार्य सुरू केलें तर-प्रेसशीं संबंध, अुत्तम व्यवस्थापक, थोडें भांडवल व अेक फिरता तुमचेसारखा अेजंट, अेवढें प्रथम जुळवून आणा. प्रकाशकामध्यें अभिरुचि अुत्तम हवी व कमी खर्चांत काम

असणार पुढ भुसावळ, जळगाव, मुबअी (पाली) व अहमदाबाद, असा अेक महिना जाअील

वेळगुदीचा रिपोर्ट परत पाठवीत आहे बेळगुदीचें अुत्पन्न का घटलें, समजत नाहीं पूर्वी रोज २०० रुपये होत असत, शेतसारा देअून असो मुरलीधरला आता तावडतोब अेक झोंपडी किंवा घर बाधून दिलें पाहिजे. जर त्यानीं वेळगुदीलाच केंद्र काढण्याचें ठरविलें तर त्याना गहाण्यासाठीं व वर्ग चालविण्यासाठीं अेक प्रशस्त जागा बाधून द्यावी मजकडून दोनशें रुपये या कामीं तावडतोब मिळतील बाकीचे तेथून गोळा करावे पू गगाधररावाचा व शिरगावकराचा अभिप्राय विचारावा मुरलीधरला काहीं पुस्तकेंहि पाठवीन

तुम्ही दक्षिणामूर्ति विद्यार्थी-भवन, भावनगर, काठियावाड, या पत्त्यावर पत्र लिहून त्यांचें 'वार्तानु शास्त्र' मागवून घ्या त्यात तुम्हाला बरीच माहिती मिळेल त्याची वसतमालाहि चागली आहे मजजवळ असलेलीं पुस्तकें मी पाठवीन

जर तुम्हीं साक्षरता-प्रकाशन कार्य सुरू केलें तर-प्रेसशीं सबध, अुत्तम व्यवस्थापक, थोडें भाडवल व अेक फिरता तुमचेसारखा अेजट, अेवढें प्रथम जुळवून आणा प्रकाशकामध्यें अभिरुचि अुत्तम हवी व कमी खर्चांत काम करता आलें पाहिजे गगाधररावानीं आजवर स्वत.चा प्रेस केला नाहीं, हें आश्चर्य खरें ! पण अुशीर झाला, असें केव्हाच नसतें कोणाला तरी अुभे करा *तरुण भारत* तुमच्या उपयोगी पडेलच पण प्रकाशनासाठीं भाडवल तयार करा व वाणियाची हिशोबी दृष्टी शिका

कुमार दिनानाथ केकरेचें माझ्या वतीनें अभिनदन करा त्याची माहिती हिंदी कॉलममध्यें का दिली नाहीं ?

—चा get up चांगला नाहीं, हें तुम्हाला पटतें काय? रूपाकृति (get up) सुधारल्यानें पत्राची प्रथम प्रतिष्ठा वाढते व मग प्रार्थाहि वाढते

गाधी-सिद्धात-स्वाध्याय आणि प्रवर्तन मडळ (study circle) तयार झालें तर कर्नाटकात किती केंद्रें स्थापता येतील ? हुबळी, होसरित्ति, निपाणी मगळूर, कारवार, अुडपी, बळ्ळारी, बगळूर, गदग, वेळगाव विजापूर, अित्यादि

तुम्हाला पैसे घेता आले पाहिजेत सर्व रचनात्मक कार्यक्रमात तुमची मडळी नसली तर कसें चालावें ? तुम्ही तुमचीं व्यक्तिगत भांडणें भांडू पाहाता, असें मीं म्हटलें नव्हतें पण कर्नाटकात आज जी भाडणें आहेत, त्याचा स्पर्श तुमच्यामुळें, तुमच्या कार्यामुळें आम्हा त्रयस्थाना होऊ नये, अेवढेंच माझें म्हणणें होतें दिवाकर हिंदीप्रचाराला अनुकूल आहेतच ते कानडी लिपी सोडावयास तयार होणार नाहींत, पण नागरी लिपीमध्यें मधून मधून कानडी लेख आले, तर त्याना तें आवडेलच या दृष्टीनेंच त्याच्या वृत्तीकडे पहा, म्हणजे त्यांची अधिकाधिक सेवा आपल्याला लाभेल

...ची पद्धत अनुकरणासाठीं मीं तुम्हाला सुचविली नव्हती तुमचें धोरण मला पसत आहे शेवटीं तेंच सफळ होणार

तुम्ही आजवर सेवक म्हणून राहिला आहात, आता जरा शिष्ट बना. अहमन्य बनण्याची जरूर नाहीं, व तुम्ही कधीं बनणार नाहीं, हें मला ठाऊक आहे पण अितक्या वर्षांच्या सेवेनतर अधिकार-युक्त वाणीनें बोलत चला

हुबलीचें काम हाच तुमचा किल्ला आहे तो अधिकाधिक बळकट करून सर्व कर्नाटकात काय चाललें आहे, अिकडे लक्ष दिलेंच पाहिजे

पू गगाधररावांची सहानुभूति अच्युतराव पटवर्धनाच्या बाजूला आहे, तरी वर्किंग कमिटींत असल्यानें त्यानाच त्या पक्षाला विरोध करावा लागत आहे.

यापुढें लाब लाब पत्रें लिहू शकणार नाहीं

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

  

७७

ॐ　　　　वर्धा

२४ १२ ३५

प्रिय पुडरीकजी,

मी आज अिंदूरला जात आहें मराठी साहित्य-समेलनात हिंदीचा प्रतिनिधि म्हणून जात आहें ! ता २८ ला परत येअीन २८ ते ३१ येथें

असणार पुढें भुसावळ, जळगाव, मुरबी (पाली) व अहमदाबाद, असा अेक महिना जाअील

बेळगुंदीचा रिपोर्ट परत पाठवीत आहे बेळगुंदीचें अुत्पन्न कां घटलें, समजत नाहीं पूर्वी रोज २०० रुपये होत असत, शेतसारा देअून असो मुरलीधरला आता तावडतोब अेक झोंपडी किंवा घर बाधून दिलें पाहिजे. जर त्यांनीं बेळगुंदीलाच केंद्र काढण्याचें ठरविलें तर त्याना राहाण्यासाठीं व वर्ग चालविण्यासाठीं अेक प्रशस्त जागा बांधून द्यावी मजकडून दोनशें रुपये या कामीं तावडतोब मिळतील बाकीचे तेथून गोळा करावे पू गंगाधररावांचा व शिरगावकरांचा अभिप्राय विचारावा मुरलीधरला काहीं पुस्तकेंहि पाठवीन

तुम्ही दक्षिणामूर्ति विद्यार्थी-भवन, भावनगर, काठियावाड, या पत्त्यावर पत्र लिहून त्यांचें 'वार्तानु शास्त्र' मागवून घ्या त्यात तुम्हाला बरीच माहिती मिळेल त्यांची वसतमालाहि चागली आहे मजजवळ असलेलीं पुस्तकें मी पाठवीन

जर तुम्हीं साक्षरता-प्रकाशन कार्य सुरू केलें तर-प्रेसशीं संबंध, अुत्तम व्यवस्थापक, थोडें भांडवल व अेक फिरता तुमचेसारखा अेजट, अेवढें प्रथम जुळवून आणा प्रकाशकामध्यें अभिरुचि अुत्तम हवी व कमी खर्चांत काम करता आलें पाहिजे गंगाधररावांनीं आजवर स्वत.चा प्रेस केला नाहीं, हें आश्चर्य खरें ! पण अुशीर झाला, असें केव्हाच नसतें कोणाला तरी अुभे करा तरुण भारत तुमच्या उपयोगी पडेलच पण प्रकाशनासाठीं भांडवल तयार करा व नाणियाची हिशोबी दृष्टी शिका

कुमार दिनानाथ केकरेंचें माझ्या वतीनें अभिनंदन करा त्याची माहिती हिंदी कॉलममध्यें का दिली नाहीं ?

—चा get up चांगला नाहीं, हें तुम्हाला पटतें काय? रूपाकृति (get up) सुधारल्यानें पत्राची प्रथम प्रतिष्ठा वाढते व मग प्रामाणिहि वाढते

गांधी-सिद्धांत-स्वाध्याय आणि प्रवर्तन मंडळ (study circle) तयार झालें तर कर्नाटकात किती केंद्रें स्थापता येतील? हुबळी, हॊसरित्ति, निपाणी मगळूर, कारवार, अुडपी, बळ्ळारी, बगळूर, गदग, बेळगाव. विजापूर, अित्यादि

ठिकाणीं study circles अुत्पन्न झालीं पाहिजेत यानिषयीं पुढें पत्र लिहीन

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

---

७८

ॐ मगनवाडी वर्धा

६-१-३५

प्रिय पुंडलीकजी,

पुष्कळ पुष्कळ दिवसानीं तुमचें अक्षर पहावयास मिळालें तुम्ही आता सेवक नसून कार्यकर्ते झाला आहात तेव्हा तुमचीं पत्रें लवकर मिळणार नाहीत, हें मला समजतें पण येतात तेव्हा पूर्वीप्रमाणें सविस्तर येतात, ही आनंदाची गोष्ट आहे

अुदाहरण फारच दुःखद आहे बापूजींच्या कानावर गेल्यास त्यांना कर्नाटकसंबंधानें फारच वाअीट वाटेल असाच प्रकार जर आपल्या प्रांतात वाढला, तर मला वाटतें, त्याला अुपाय म्हणून अेक सार्वजनिक अुपवासाचा दिवस मुकर करावा लागेल बापूजींची तपस्या अितर कोणाहि व्यक्तीमध्यें नाहीं पण सर्व जनतेनें मिळून काहींतरी अिलाज शोधून काढलाच पाहिजे मला जो सुचला तो कळविला आहे तुमच्या दप्तरीं सभाळून ठेवा

ब्राह्मणेतर पक्षाला वळवून घेणें तुम्हा-आम्हाला कठीण असलें, तरी अशक्य होता कामा नये चर्चेचा मार्ग सोडून देअून सेवेचा, त्यागाचा आणि आत्मविलोपनाचा मार्ग अमलात आणला पाहिजे

शुष्क वाद, अुत्तराळ्या-पारगळ्या, कानडी-मराठी वाद, ब्राह्मण-ब्राह्मणेतर, तेढ हे सर्व प्रकार, समाज जागा झाल्याचें पण क्षीणवीर्य आणि चारित्र्यहीन

असल्याचें चिन्ह आहे या सर्वाला अुपाय अेकच आहे व तो तुम्हाला समजलेला आहे

बेळगुंदीसंबंधानें जें ठरेल तें मला कळवालच

गांधी-वाङ्मय प्रसिद्ध करण्यासाठीं प्रत्यक्ष लेखनकार्य करणाऱ्या मंडळींचें अेक बोर्ड करणें योग्य आहे पण केवळ संमति देणाऱ्या दोड्डाचार्यांचें संपादक-मंडळ करुन कितपत फायदा आहे, याविषयीं मला शंका आहे प्रत्यक्ष सेवा करुन प्रतिष्ठा मिळवावी व मगच शोभा म्हणून लब्धप्रतिष्ठित लोकांचा सहकार मागावा पेट्रनेज म्हणून नांवाचा सहकार मिळवू जाता तो फार महाग पडतो तुम्ही दिवाकरांना स्पष्ट लिहा कीं, अेकटे दिवाकर आमच्या बरोबर असले म्हणजे आम्हाला संतोष आहे चित्रविचित्र विचारानें भारलेल्या मंडळींचें संघटन सांधणार नाहीं आणि बजबजपुरी माजेल तुम्ही आणि वडवी यांची कानडी भाषा कची असल्यास गांधीविचार समजणाऱ्या कोणा भाषा-भिज्ञाची मदत घ्या, पण वायाची मोट बांधू नका

तुम्हाला कानडी लिपीचा बाजू वाटू नये तुम्ही धूनराम नाहीं आहा. अुगीच्या अुगीच गाथारी का होता? बारी प्रथम पुष्कळ अैकानें मग वाचण्यास सुरुवात करावी, ही पद्धतिच चांगली

गांधी-वाङ्मयाचीं पुस्तकें आता मजकडे पूर्वींसारखी येत नाहींत व मी देखील ' स मृण्मये नीतहिरण्मयत्वात् ' यासारखा झालों असल्यामुळें कुबेरा-वर मोहीम वेअून जाअून तुम्हांला पुस्तकें पाठविण्याचा प्रयत्न करीन. गांधी-वाङ्मयातील पुस्तकांची यादी लवकरच तयार करवयास जेठालालना लिहीत आहें तुम्हीहि त्यांना लिहा त्यांचा पत्ता —

१९३२, मांडवीनी पोळ, अहमदाबाद, असा आहे

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

# ७९

वर्धा
९-८-३७

प्रिय पुंडलीकजी,

परस्पर – श्रम – सहाय्यक – संघाची कल्पना अुत्तम आहे मीं धोलवड – बोर्डीला असताना तेथील वारली लोकांमध्यें अशा तऱ्हेचा रिवाज पाहिला होता गरीब बिचाऱ्याजवळ ना धन ना धान्य, ना मोठीं शेतें ना पुष्कळ गुरें, आणि पाअूस झोडपू लागला म्हणजे अेकट्याच्यानें झोंपडीचें काम कसें होणार ? तेव्हा शेजाऱ्याना मदतीला बोलवायाचें कसली तरी भाकर किंवा पेज वाढायाची आणि परस्पराचें काम करायाचें सर्व भांडवल जाअील पण शरीरश्रमाचें भांडवल–मुडदे आणि पाढरपेशे याना वगळतां– सर्वांजवळ असतें

आजची परिस्थिति पाहातां माझा दृढ अभिप्राय आहे कीं, कार्यकर्त्यांनीं स्वत:च्या पोटासाठीं शेती करीत राहू नये पण शेतकऱ्याच्यामध्यें मिसळून, त्याचेसारखें राहून, त्याचा आहार खाअून, मधून मधून त्याच्या कामाला हातभार लावावा पण शेतीचा बोजा आणि शेती जातीनें करून चरितार्थ चालविण्याचा आदर्श बाळगू नये अर्थोपार्जन करणारे शेतकरी, कारागीर, मजूर, पाथरवट, धनगर, चांभार, अित्यादि सर्वांच्या कामास हातभार लावून त्याचेकडून भिक्षा म्हणून जी काहीं आजीविका मिळेल, ती घेअून अनासक्त-पणें अनिकेत आणि स्मशानशा क्षेत्रांत मधून मधून परिव्राजक होअून रहावें पतग नसले तर झाडाला फुलें फळें येत नाहींत सर्वांना Fertilise करण्याचें, फळवण्याचें काम पतग करतात आजच्या स्वराज्य–सेवकांनीं असे पतग बनून जनतेची सर्व शक्ति जागृत केली पाहिजे वणवण हिंडूहि नये आणि झाडासारखें अेक ठिकाणीं स्थावर राहून पादपहि होअू नये पण वेलीसारखें केंद्राच्या आसपास पसरत असावें

सप्टेंबरमध्यें हिंदीप्रचारासाठीं मी म्हैसूरकडे जाण्याचा संभव आहे

सर्वांच वर्गांची नीतिमत्ता सुधारली पाहिजे, मध्यम वर्गाची आर्थिक स्थिति सुधारली पाहिजे आणि अगदीं खालील गरीब, खेडवळ, मागासलेल्या, दुधाश लोकांमध्यें धर्मविषयक कल्पना सुधारल्या पाहिजेत, हा माझा सिद्धांत तुम्हाला ठाअूक आहेच. या रीतीनें खेडेगांवांतील लोकांमध्यें प्रवेश झाला पाहिजे. कुमरीमध्यें चाललेल्या स्वच्छतेच्या कामांत लोकांची विष्ठा अुचलून दूर टाकण्याचें काम येतें किंवा नाहीं ? तें आलें पाहिजे.

शंकरराव भागवतांची माझ्यावर फारच चांगली छाप पडली आहे. त्यांची कार्यपद्धति पुष्कळ सुधारण्याजोगी आहे. पण त्यांची अुत्कट कळकळ, निष्ठा आणि त्याग हीं आजच्या महाराष्ट्रांत शोभत नाहींत असें वाटतें. अथवा तेच अुद्यांचा महाराष्ट्र आज तयार करीत आहेत, असें म्हणणें रास्त होईल.

काकाचा
सप्रेम वंदे मातरम

८०

वर्धा
११-१०-३५.

प्रिय पुंडलीकजी,

तुम्हाला जी प्रस्तावना देणार होतों, ती मीं रद्द केली. ज्या विषयांची चर्चा प्रश्नोत्तरींत होअून गेली आहे, त्यांचीच पुनः विस्तृत चर्चा करण्यांत प्रश्नोत्तरीला तरी फिकी पाडणें, किंवा प्रस्तावनेला फिकी पाडणें अपरिहार्य झालें असतें. तेव्हां तो सर्व घाट बदलून अगदीं नवी अेक्सेलशिऑर प्रस्तावना लिहून पाठवीत आहें. थोडासा अनुकूल प्रयत्न केलात तर तुम्हाला ही फारच आवडेल. तुमच्या ' तालीम-संस्थेला ' प्रथम जरा ठेंचाळल्यासारखें वाटेल व मग वाटेल कीं, काकांनीं आपला फारच गौरव केला. माझ्या मतें यांत केलेल्या सूचना महाराष्ट्रमध्यें रुजल्याच पाहिजेत. अेवढीच प्रस्तावना

निराळी लिहून काढून जर 'लोकशक्तींत' पाठवून द्याल, तर तुमच्या प्रश्नोत्तरींचा खप कमी न होता वाढेल हें तुम्हाला पटतें का? पूर्वी कल्पना केल्याप्रमाणें प्रस्तावना दिली असती, तर मात्र निराळी प्रस्तावना वाचल्यानंतर लोकांना वाटलें असतें की आतां प्रश्नोत्तरींत काहीं अुरलें नसावें

काकाचा
सप्रेम वंदे मातरम्

## ८१

वर्धा
८ १० ३०

सप्रेम नमस्कार वि वि

'महाराष्ट्र बुद्धिमान् आहे काय?' या प्रश्नावर आपण माझे विचार मागितले आहेत या विषयावर लिहिण्याची माझी मुळींच तयारी नाहीं पण द्यूताला आव्हान केलें असतां जुगारबाज ज्याप्रमाणें आमंत्रणाचा अव्हेर करीत नाहीं, त्याचप्रमाणें केव्हां केव्हां लिहावयाची सवय असलेला मनुष्य कोणी प्रश्न केला असतां सवयीमुळें अुत्तर देण्याला प्रवृत्त होतो या भानगडींत पडूं नको, असें मन आतून सांगत असलें तरी प्रश्नाचीं अुत्तरें देण्याची सवय असलेला अध्यापक व्यसनाला बळी पडतोच

माझें अुत्तर खालील प्रमाणें आहे —

हिंदुस्थानांतील सर्वच प्रांत आपापल्या परिस्थितीप्रमाणें कमीअधिक बुद्धिमान् आहेत इतर प्रांतापेक्षां महाराष्ट्रीय अधिक बुद्धिमान् असण्याचें कारण नाहीं, आणि ते तसे आहेत, असें मला वाटतही नाहीं

अिंग्रजी राज्य सुरू झालें, तेव्हां शिक्षण-खात्यात महाराष्ट्रीय लोक अधिक शिरले असतील, त्यामुळें गुजरात, कर्नाटक, सिंध, इत्यादि प्रांतांत त्यांच्या नेमणुका झाल्या त्या प्रांतांतील लोकांना सरकारी शिक्षणाची आणि पुस्तकी विद्वत्तेची फारशी महती त्या वेळीं वाटली नसेल त्या काळीं कांहीं महा-

राष्ट्रीयांनी तेथील लोकांना हिणविण्याचा प्रयत्न केला, हें मला ठाऊक आहे. लाकडाचा ठलपा चोलता करणाऱ्या मिशनऱ्यांप्रमाणें आपण रेड इंडियन लोकांमध्यें आलों आहोंत, असें त्यांना वाटलें असेल पण ती स्थिति चिरकाल कशी टिकावी ? आपल्या अभिमानानें शेजाऱ्यापाजाऱ्यांसंबधानें अनुदार अभिप्राय मनांत बाळगणें, हा असंस्कारी मनुष्याचा स्वभावच आहे. प्राचीन काळापासून सर्वच देशांमध्यें ही वृत्ति दिसून येते महाभारतांत देखील प्रांताप्रांताच्या अनाचारासंबधानें अुखाळ्यापाख्याळ्या काढलेल्या आपणास वाचावयास मिळतात भारतीय युद्धानंतर यादवांनी दारू पिऊन जी चर्चा केली आणि यादवी माजविली ती देखील अशाच वृत्तीनें

प्रथम प्रथम अिंग्रजी विद्येंत बंगाली लोकच पुढें सरसावले त्यांची बरोबरी करतां येअीना म्हणून आपण त्यांना ‘ बोलघेवडे ’ या विशेषणाचा अहेर करून स्वत:चा आत्मविश्वास सभाळला गुजराती लोक ‘ शामळू ’, कानडी लोक नेंगळूळ, सिंधी सुतरस्यासारखे, मारवाडी कवडीचुंबक, पंजाबी मद्द डोक्याचे, वगैरे अभिप्राय आपण सार्वत्रिक सत्य म्हणून अगदीं मोकळेपणानें वापरू लागलों आतां हीं सर्व विशेषणें त्या त्या लोकांना लागू पडतात, असें म्हणण्या-चें धारिष्ट आपल्याला होत नाहीं आणि हे दोष आपल्यांत नाहींत, असेंहि आतां आपल्याच्यानें म्हणवत नाहीं या दहा वर्षांत आपण राष्ट्रसंघटनेचें कार्य किती केलें आणि बोलघेवडेपणा किती केला, अथवा शंकु भटजीचे तर्कवितर्क किती काढले, याचा विचार केला तर मनाला स्वस्थता वाटणार नाहीं दुसऱ्याच्या कार्यक्रमांतील दोष शोधून काढणें, यास कांहीं मोठी हुशारी लागत नाहीं महाराष्ट्रांतल्या सर्वच पक्षांतील लोकांनी आपल्या मनाशीं पहावें कीं, स्वत पसंत केलेला कार्यक्रम आणि स्वत ला मान्य असलेलें राष्ट्र-संघटन आपल्या हातून कितपत पार पडलें आहे

महाराष्ट्र बुद्धिमान् नाहीं, असेंहि मला म्हणावयाचें नाहीं शिवाजीनें राज्य मिळविलें, राजारामानें मोठ्या शर्तीनें तें राखलें, पेशवाअीमध्यें त्याचा मोठा विस्तार झाला पण त्या काळांत बुद्धिमत्तेची चमक दिसून येअील अशी ग्रंथसंपत्ति किती झाली, असा प्रश्न आपल्यापुढें येणारच. पेशवाअींत विद्वानांना दक्षिणा कमी मिळत नसे

आणि महाराष्ट्र बुद्धिमान् आहे का, हा प्रश्न विचारताना आपण कोणत्या महाराष्ट्राचा विचार करतों? पाध्ये आणि न्किंकर यानीं लिहिलेला 'आज-कालचा महाराष्ट्र' माझ्या हातात आहे त्याच्या शेवटीं जीं अनेक नांवें दिलेली आहेत, त्यापैकीं बहुतेक ब्राह्मण मडळींचीच आहेत महाराष्ट्रातील बऱ्याचशा नावाजलेल्या चळवळी ब्राह्मणाच्याच हातीं आहेत, अशी परिस्थिति का असावी? तेव्हा प्रिन्सिपाल गोळ्यांनीं केलेल्या व्याख्येप्रमाणें जे ब्राह्मण गणले जातात त्याच्या बुद्धिमत्तेचा येथें विचार करावयाचा का महाराष्ट्रातील निरनिराळ्या धयात पडलेल्या हुन्नरी आणि कारागीर लोकांचा विचार करावयाचा? कोणीहि पुढें जाऊं लागला तर त्याची कदर करून त्याला मदत करण्याच्या ऐवजीं त्याचीं छिद्रें शोधून त्याचे पाय ओढण्यात पटाईत अशा लोकाच्या बुद्धीचा विचार करावयाचा, कीं 'अध्यात्मिक' लोभानें नामर्द बनलेल्या आणि साधु-भोंदूच्या मार्गे लागलेल्या भाविक लोकाच्या बुद्धिमत्तेचा विचार करावयाचा? महाराष्ट्रातील 'ध' चा 'मा' करणाऱ्या आनदीबाईचा विचार करावयाचा? का शिक्षण दिलें असता 'ध' चा 'मा' करतील, या भयानें शिक्षणाला विरोध करणाऱ्याचा विचार करावयाचा?

माझा अभिप्राय आहे कीं, महाराष्ट्रातील हरिजन बुद्धिमान् आहेत, महाराष्ट्रातील स्त्रिया बुद्धिमान् आहेत, कोंकणातून देशावर येणारे 'घाले' बुद्धिमान् आहेत बुद्धिमान् नाहीं कोण? खरा प्रश्न हा आहे कीं, महाराष्ट्रातील बुद्धिजीवी आणि शिक्षणसपन्न अशा लोकामध्यें ज्ञाननिष्ठा आहे कीं नाहीं बोस, रॉय किंवा रामन् होण्यासाठीं कदाचित् पैशाची जरूर असेल, पण उत्तम गणितज्ञ, उत्तम साहित्यिक, तत्त्वज्ञ अथवा राष्ट्रधुरीण होण्यास खर्चाळ लॅबोरेटरीची (प्रयोगशाळेची) जरूरी नसते इतर प्रातात कदाचित् पैसा अधिक असेल, पण इतर प्रांतातून पुढें आलेले लोक स्वत धनवान् होते कीं काय, किंवा धनाच्या जोरावरच ते पुढें आले कीं काय, हाहि प्रश्न विचारात घेण्यासारखा आहे

आपल्या समाजाचें सामर्थ्य आणि संघटन वाढविण्यासाठीं पुढारलेल्या लोकानीं मागासलेल्या लोकाना हातभार लावला पाहिजे, त्यास प्रयत्न केले

पाहिजेत आणि ते अेकाद्या संकुचित जातीपुरते नसून यच्चयावत् महा-राष्ट्रीयांसाठी झाले पाहिजेत हें ज्याला पटलें नसेल, त्याला मी बुद्धि-मान् म्हणणार नाहीं कार्यानंदापेक्षा वादानंद ज्याला अधिक प्रिय असेल, त्यालाहि मी बुद्धिमान् म्हणणार नाहीं स्वतःला यश का आलें नाहीं, याची सांगोपांग मीमांसा करून स्वस्थ बसणाऱ्याला बुद्धिमान् कसें म्हणावें? जगात केवळ मीमांसा नको असते, पण अिलाज हवा असतो, दोष दूर करण्याची निष्ठा हवी असते

'आपापसात फूट पडली असता शत्रूस फावतें' हा अत्यंत मोलाचा सिद्धांत लिहिण्याअितका राघोबादादा भारी हुशार होता पण त्याला आपण आज बुद्धिमान् म्हणू का?

अेक महाराष्ट्रीय गृहस्थ काठेवाडमध्यें जाअून म्हणाले होते म्हणे, कीं, आमचेकडे बुद्धि आहे पण पैसा नाहीं तुमचेकडे पैसा आहे पण विद्वत्ता नाहीं तेव्हा तुम्ही आम्हाला पैशानें मदत करा, आम्ही आमच्या विद्वत्तेनें मदत करू. तेथील लोकांना हें कितपत रुचलें असेल कोण जाणे! गुजराती-मध्यें म्हण आहे 'भण्या पण गण्या नही' – शिकले, पण शहाणपण आलें नाहीं गुजरातीमध्यें पढत मूर्खांना 'वेदिया' म्हणतात

(अपूर्ण)

# ८२

वर्धा

१३-१२-३५

प्रिय पुंडलीकजी,

तुमच्या मंडळींपैकीं तुम्ही, वडजी आणि श्रीरंग या तिघांचा मला कमी-अधिक परिचय आहे बाकी .. ... ... ... .. ... हीं माझ्या वांट्याला नांवेंच आहेत. ते आदर्श मूकसेवक असतील किंवा तुमच्या खेड्यांतील बाहुली असतील ते निष्ठावान् आहेत का सांगकामे आहेत, अनासक्त निष्काम कर्मयोगी

आहेत का विधवेसारखे आश्रित आहेत, याची मला मुळींच कल्पना नाहीं. ते काटकसरी आहेत, का खर्च करण्यात पडाओत असूनहि द्रव्याभावामुळेंच मितव्ययी झाले आहेत, याचीहि मला कल्पना नाहीं संस्था काढणारे सर्वच लोक नेहमीं आज्ञाधारक पण निर्जीव अशा डोंपट्याचा भार सहन करतात चळवळे लोक याहून धूर्त ! विंचवाचें बिऱ्हाड पाठीवर या न्यायानें अेकट्याचा विचार करतात

श्रीयुत कामत बेळगावलला हिंदीचेंहि काम सुरू करणार का ?

तुम्ही काय आणि बडवी काय आणि कदाचित् मी काय, अक्षराचे अुपासक सगळे शेवटीं अक्षरांतच जाअून पडावयाचे आपण आतां अक्षरें सोडून दिलीं पाहिजेत, अक्षरोपासकाना या जगात न ठेवता अक्षर-धामाला पाठविण्याची व्यवस्था केली पाहिजे

आज साभरतेचा प्रचार करणें म्हणजे विजयी होअर, सँकी, विलिंग्डन, ब्रेबोर्न याच्या सुधारणा गवविण्याची, अर्थात् त्या सुधारणा यशस्वी करण्या-साठींच राबण्याची तयारी करणें आहे अिंग्रजींत ' to catch a tartar ' असा जो वाक्यप्रयोग आहे, त्याच्याच तोडीचा रानविणें हा प्रयोग आहे मग्मरून राबावयाचें, लभ्यांश काहीं नाहीं आणि मग म्हणावयाचें सुधारणा आम्ही राबवितों

कोणतीहि योजना ' पण पैसा नाहीं ' या मडक्षरावर येअून आडळली म्हणजे समजावें कीं मुळात काहीतरी चुकल आहे, अयथार्थ आहे खरी गोष्ट अशी आहे कीं जानमेहनतीनें वाढवलेलें काम, स्वत ला लागणारा पैसा स्वत पण करून आणतें कामाच्या मोबगीला स्वार्ईच मेहनतीचा पाहिजे, पैशाच्या विजेचा नको

अेखादें भूत जागें करावयाचें आणि मग त्याला thus far and no further म्हणावयाचें, हें आजवर कुणाला साधलें आहे काय ? स्त्रीशिक्षणा-च्या बाबतींत समाज असेंच म्हणाला जें काम सुरू केलें आहे, त्याची पूर्ण वाढ होणारच मग त्यातून त्याचा अिलाज किंवा त्याचा अुतार आतूनच तयार होअील तेव्हा खरा आपण निराळ्याच संस्कृतीचे प्रतिनिधी आहोंत. पण तिची निष्ठा, सुचणूक आणि हिंमत हीं आपल्यात नाहींत, अेवढेंच

याच अंकात माझा लेख ' काँग्रेसचें समाजकारण ' हा आहे. हा लेख चांगल्यांपैकीं आहे पण संपादकानीं तो अगदीं शेवटीं टाकून त्यावर अन्याय केला आहे मी या मंडळींशीं सहकार करीत आहें, पण त्याना मला दूर ठेवावेंसें वाटत असलें पाहिजे तुम्ही मंडळी खाजगी भाषणात व जाहीर सभेंत मला म्हणत होता कीं, याला महाराष्ट्रात यावयास नको आतां आलों आहें आता पाहू माझा काय उपयोग करून घेता तें पण हें विपयातर झालें.

या लेखाचें कानडी करून संयुक्त कर्नाटकामध्यें देण्याची व्यवस्था कराल का ? त्यात अेक चूक आहे व्हिकिंगचें हिकिंग झालें आहे Viking हे अिंग्रजींचे पूर्वज होत

घटेच्या कामाची काळजी वाटते याळगींकडून सध्या मदतीची अपेक्षा करू नये आपणाला सर्व ब्राह्मणेतर लोकांकडून मदत मिळविता आलीच पाहिजे बेळगावच्या पारसी व ख्रिस्ती लोकाकडूनहि मदत मिळविली पाहिजे. मी जेव्हा बेळगावला येअीन तेव्हा स्थानिक पुढाऱ्याना बरोबर घेअून असा प्रयत्न करून पाहीन तुम्ही मंडळींनीं बेळगावच्या जनतेला माझी ओळख करून दिली तर त्यांचेकडून मदत मिळविणें शक्य होअील अर्थात् हे पैसे तुमचेकडेच राहतील

जळगांव

१-१-३६

मीं नुकताच चित्रशाळेच्या 'ध्रुवा' साठीं एक लेख लिहिला आहे, तो पहाल त्याचेंच जुनें टांचण या सोबत पाठवीत आहें तुमचेजवळ ठेवून द्या. हें रद्द केलेलें टाचण आहे, म्हणून तें कोणासहि वाचावयास देअू नका. मला आता प्रत्यक्ष सेवा करण्याचा प्रसंग आला आहे, तेव्हा बोलण्या-लिहिण्यात संयम बाळगला पाहिजे तुमचें 'हिंदीशिक्षक' जर वेळेवर छापावयास न गेलें तर तें रद्द करावें लागेल कारण पुस्तकावाचून बरेंच अडतें

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

८४

## महाराष्ट्र बुद्धिमान् आहे काय ?

लेखकः- आचार्य काका कालेलकर

महाराष्ट्र बुद्धिमान् आहे काय, हा प्रश्न कितीहि जिव्हाळ्याचा असला, तरी ज्याला समाजांत वावरुन प्रत्यक्ष समाजसेवेचें काम करावयाचें आहे, त्यानें याचें अुत्तर न दिलेलेंच बरें. अस्तिपक्षीं, नास्तिपक्षीं आणि तटस्थ-पक्षीं, कोणतेंहि अुत्तर सोयीस्कर नाहींच.

हा प्रश्न जितका अडचणीचा आहे, तितकाच तो आकर्षकहि आहे. महाराष्ट्राच्या आरोग्यासंबंधानें किंवा शरीरसंपत्तिसंबंधानें किंवा भौतिक संबंधानें जर प्रश्न विचारला असता, तर केवळ तज्ज्ञांनींच त्याचें अुत्तर देण्याचें धाडस केलें असतें; पण अीश्वर, धर्म, कला, नीतिमत्ता, यासारख्या गहन विषयांवर मनुष्यानें ज्याप्रमाणें आपला अभिप्राय व्यक्त करावा, त्याप्रमाणें अशा प्रश्नाचें देखील अुत्तर देण्याची मनुष्याला बुद्धि होते.

आजचा महाराष्ट्र अितर प्रांतांच्या मानानें कितपत बुद्धिमान् आहे, असा या प्रश्नाचा अर्थ होअूं शकेल किंवा जीवनसाफल्याच्या दृष्टीनें महाराष्ट्राची बुद्धिमत्ता पर्याप्त आहे किंवा नाहीं, असाहि याचा अर्थ होअूं शकेल. पुष्कळ लोकांना पहिलाच अर्थ अभिप्रेत आहे हें मला ठाअूक आहे. पण खरोखर प्रांताच्या हिताच्या दृष्टीनें विचार करता दुसऱ्या अर्थानेंच या प्रश्नाची छाननी झाली पाहिजे.

बुद्धिमत्ता कोणत्या प्रकारची समजावयाची ? अिंग्रजी राज्य झालें आणि शाळाखातें स्थापन झालें, तेव्हां सिंध, गुजरात, महाराष्ट्र, कर्नाटक या चारहि प्रांतांमध्यें नोकरीचें सूत्र अेक असल्यानें महाराष्ट्रीयांना या चारहि प्रांतांत हिंडतां आलें. पुस्तकी अथवा "शालीन" शिक्षण त्या वेळीं महाराष्ट्रांत खात्रीनें होतें. त्यामुळें महाराष्ट्राला कांहींसा पुढाकार मिळाला. जर महाराष्ट्रीयांना त्या त्या प्रांतांतील समाजांत समरस होतां आलें असतें आणि लोकहिताची दृष्टि त्यांनीं संभाळली असती तर हा पुढाकार शोभला असता आणि कदाचित् टिकलाहि असता.

महाराष्ट्रात विद्याव्यासंग आहे यांत शंका नाहीं विद्याप्रतिभा अितर प्रांतापेक्षा अधिक आहे किंवा नाही हें सांगणें कठीण आहे पुष्कळशीं पुस्तकें वाचणें, त्यांचा सारांश काढता येणें, परीक्षांमधून पास होणें, वर्तमानपत्रांतून चर्चेला खंड पडू न देणें, तर्कवितर्कांचे फवारे अुडवत ठेवणें, याला कोणी बुद्धिमत्ता म्हणत नाहींत आणि म्हटलें तरी तेवढ्यानें संतोष मानता येत नाही

प्राचीन आर्यांनीं अेक प्रकारचें जीवनशास्त्र आणि जीवनकला यांचा विकास करून दाखविला आज युरोपांतील राष्ट्रें आपापल्यापरी निराळींच जीवनशास्त्र आणि जीवनकला विस्तारून दाखवीत आहेत यांनाच आपण संस्कृति म्हणतों जगामध्यें संस्कृतीचे अनेक नमुने नांदत आहेत हे नमुने आपापल्यापरी वाढतात, अेकमेकांकडून पोषण घेतात, त्यांचा संघर्ष होतो, त्यांतून जीवनकलह अुत्पन्न होतो जीवनकलहामध्यें कसोटी दोन प्रकारची असते (१) कुस्ती जिंकून जगणें आणि (२) जीवनाची श्रेष्ठता मिळवून तिचा विकास करणें पहिल्यापेक्षा दुसरी कसोटी अधिक महत्त्वाची आहे या दृष्टीनें आपला प्रांत बुद्धिमान् आहे किंवा नाहीं, याचा विचार झाला पाहिजे.

आपला प्रांत जर बुद्धिमान् असला तर व्यापारांत, अुद्योगहुन्नरांत, शिक्षणाला नवी दिशा लावण्यांत, राजकारणाला तेज पाडण्यांत, सर्व समाजाला संघटित करण्यांत, नीतीमध्यें अुत्तरोत्तर पुढें जाण्यांत, ती बुद्धिमत्ता दिसून आली पाहिजे

जेव्हा अेखाद्या प्रांतांत प्रांतीय संघटन दिलें असतें व लोकांना दिवसेंदिवस लहान लहान गट पाडून तेवढ्यापुरताच विचार करण्याची बुद्धि होते तेव्हा त्या प्रांताची किंवा समाजाची बुद्धिमत्ता वाढीला लागली नाहीं असें म्हणावें लागतें राष्ट्राचा विचार न करता जेव्हा केवळ प्रांताचाच विचार होतो आणि त्यालाच प्राधान्य दिलें जातें, तेव्हा बुद्धिमत्ता क्षीण होत चालली आहे असें म्हणता येअील राष्ट्राचा विचार करणें कर्तव्य असल्या वेळीं हिंदु, मुसलमान, पारशी, शीख, अशा संकुचित ध्येयाचाच विचार करणें अगत्याचें वाटू लागलें म्हणजे बुद्धिमत्ता क्षीण होअू लागली आहे,

असें म्हणता येईल ब्राह्मण-ब्राह्मणेतर असा भेद जर लोकहृदयात रुजू लागला आणि अशा वेळीं तो दूर करण्याचा प्रयत्न करण्याचें सोडून *'दोष आमचेकडे नाहीं, तुमचेकडेच आहे'* असा वादवाद सुरू झाला म्हणजे बुद्धिमत्ता हासाला लागली आहे असें समजावें ब्राह्मणाल जर पोटभेद आपापलें निराळें संघटन करू लागले तर त्यांनीं समजावें कीं, बुद्धि चरावयाला गेली आहे भविष्यकाळचें हित जर समजत नसलें आणि जुन्या काळचा अभिमानच बळावलेला असला, तरी देखील बुद्धिमत्ता कमी आहे असें समजावयास हरकत नाहीं

समाजातील हरिजनासारख्या अेखाद्या घटकावर आजवर अन्याय झाला असला तर तो दूर करण्यासाठीं नुकसानीची भरपाअी वेळेवर आणि दुप्पट तिप्पट करून देण्याची आवश्यकता मनाला जर न पटली, तरी देखील समजावें कीं समाजात चातुर्य असेल पण शहाणपण नाहीं

केवळ सार्वजनिक चळवळीचाच विचार केला तर काँग्रेसमध्यें, कौन्सिल-मध्यें, जगाच्या साहित्यामध्यें, जगाचे सांस्कृतिक प्रश्न सोडविण्याच्या बाबतींत आपल्या प्रांताकडे पुढारीपण बाजूला राहो, सल्लागार म्हणून तरी *आदराचें स्थान आहे काय, याचा विचार झाला पाहिजे*

महाराष्ट्रामध्यें अेक मोठा भ्रम पसरलेला आहे, आपल्याला गुळगुळीत अिंग्रजी लिहिता येत नाहीं यामुळें आपण मागें पडलों आहोंत रवींद्रनाथ ठाकूर, महात्मा गांधी, जवाहरलाल नेहरू, सरोजिनी नायडू, सर राधाकृष्णन् किंवा बाबू भगवानदास ही मंडळी अुत्तम अिंग्रजी लिहितात पण त्यांचें प्रभुत्व भाषेमुळें नसून जागतिक प्रश्नांचें त्यांचें आकलन व भारतीय आत्मा ओळखण्याची त्यांची शक्ति, यात आहे बुद्धि जर तरल असेल पण हृदय विशाल नसेल, हिंमतीचा अभाव असेल तर त्या बुद्धीचें तेज पडत नाहीं

मला वाटतें, महाराष्ट्रानें गेल्या ५०-७५ वर्षांत परिश्रम पुष्कळ केले, पण सामाजिक संघटन अत्यंत दुर्बल असल्यामुळें आणि पेशवाअीच्या काळा-तील रागद्वेष अजून सुम्ले नसल्यामुळें आपले परिश्रम जोरदार झाले नाहींत बुद्धिमत्ता कशाला म्हणावयाचें हें ठरविणें कदाचित् सोपें असेल, पण महा-राष्ट्र ही एक सुसंघटित व्यक्ति आहे काय, या प्रश्नाचें अुत्तर अस्तिपक्षीं

देणें कठीण आहे हिंदुस्थानात परिस्थिति सर्वत्र अेकसारखीच आहे आपापसातील भाडणें आणि सकुचित स्वार्थ हीं सर्वच ठिकाणीं आहेत, पण या वस्तु महाराष्ट्राला सर्वात अधिक नडल्या आहेत मागासलेल्या लोकामध्ये जागृति येताच पुष्कळ दिवसाची भूक शमविण्यासाठीं त्याना स्वार्थ सुचणें स्वाभाविक होतें पुढारलेल्या जातीजवळ त्याना आपलेसे करून घ्यावयास पुरेसा वेळ होता पण या ५० वर्षातील पुढाऱ्यानीं त्या कामाकडे अतिशय दुर्लक्ष्य केलें, हें बुद्धिमत्तेचें लक्षण खात्रीनें नव्हे आज मागासलेल्या लोकाचा अुदय होत आहे त्याच्यामधील स्वार्थ हळु हळु, अगदीं हळु हळु का होअीना, कमी होत आहे पुढारलेल्या लोकामधील काहीं अपवाद सोडून दिले तर बहुतेक व्यापक, विशाल दृष्टि काहींशी कमी झालेलीच दिसते

ही स्थिति अशीच राहणार नाहीं अशी आशा आहे. महाराष्ट्रानें नष्टचर्याचे दिवस मागें टाकले असून आता महाराष्ट्राचा अुदय होण्याची वेळ आली आहे असें मानू या. घसरडीला देखील काहींतरी अत असणारच

अेक काळ असा होता कीं, जेव्हां महाराष्ट्राला गरीबीचें वैषम्य वाटत नसे, गरीबी असूनहि ते स्थिता टिकविण्यात मोठेपणा वाटत असे, पुढें कामें करता करता पैशाचें महत्त्व अधिकाधिक पटू लागलें, महाराष्ट्रातील श्रीमतानीं सढळ हातानें सार्वजनिक कार्याला मदत न केल्यामुळें लोकसेवकाना पैशाचें महत्त्व अधिकाधिक पटू लागलें आणि मग ‘धनान्यर्जयध्वम्’ ही स्मृति चालू झाली स्वार्थत्यागाच्या गोष्टी पर्वीअितक्या आवडत नाहींशा झाल्या, खऱ्या वाटेनाशा झाल्या महाराष्ट्रात त्यागाची परपरा अजून चालू आहे पण तिचा समाजधुरिणाना फायदा करून घेता येअीनासा झाला. कोणी त्याग करू लागला तर आम्ही त्याचें कोतुक करू, शिष्टाचाराला स्मरून त्याला नमस्कारहि करू, तो जर आपल्या वाटेस गेला नाहीं तर त्याला थोर पुरुष आहे असेंहि म्हणू, पण जर तो आपल्या धर्माची दीक्षा देअू लागला तर मात्र त्याला असें वातावरण अुत्पन्न होणें स्वाभाविक होतें महाराष्ट्र ज्या काळीं राजकारणात पुढारलेला होता, तेव्हा गुजरातचे लोक निमूटपणें पैसे मिळविण्याचा धदा अगदीं अेकाग्र मनानें करीत होतेच कीं नाहीं ?

महाराष्ट्र बुद्धिमान् आहे का, याचा अेक अर्थ असा होतो कीं, महाराष्ट्रातले पुढारलेले लोक पुरेसे बुद्धिमान् आहेत कीं नाहींत? मागासलेल्या जातींचे पुढारी स्वत:च्या जातीपुरता विचार करतात पुढारलेले लोक जाणून असतात कीं, सर्वांची काळजी वाहण्यात स्वत:च्या हिताची बाब नकळत येअूनच जाते पुढारलेले म्हणवून घेणारे लोक जर समाजातील यच्चयावत् सर्व वर्गांची आपुलकीनें काळजी वाहात असले, सर्वांचा विश्वास ते संपादन करीत असले, त्यांच्या कार्याचा सर्वांकडून यथाप्रमाण स्वीकार आणि पुरस्कार होत असला, तर त्याना कोणीहि बुद्धिमान् म्हणेलच महाराष्ट्र पहिल्या धडाडीसरसा राजकारणात पुढें गेला, जहाल मतें महाराष्ट्रात स्वाभाविक झालीं, पण पुढें दिसून आलें कीं, जसजसें पुढें जावें तसतसें या महाप्रस्थानात अधिकाधिक अेकाकी व्हावें लागतें आणि सरतेशेवटीं स्वर्गप्रवेशाच्या वेळीं केवळ धर्मराजच आपल्या निष्ठावान् कुत्र्याला बरोबर घेऊन आंत शिरावयाचा. तेव्हा हा मार्ग बरा नव्हे व म्हणून खराहि नव्हे जरा माघार घ्या, थोडे खालीं अुतरा, म्हणजे आपल्याला चारी बाजूनीं आश्रय मिळेल, पुष्कळसे लोक बरोबर असतील अशी बुद्धि वाहू लागली या बुद्धीला चांगली म्हणावी कीं वाअीट म्हणावी? "आम्ही पुढें जाण्याचें नाकारलें त्यामुळें-किंवा त्याचप्रमाणें – अितरांना देखील पुढें ठेवलेलें पाअूल मागें घ्यावेंच लागलें आम्ही वेळींच शहाणपणा दाखविला यात दोष कोणता? रामचंद्र, हरिश्चंद्र, राणा प्रताप, झांशीची राणी लक्ष्मीबाअी, शिबि राणा, मोजेस, रॉबर्ट ब्रूस, वगैरे मंडळी साधूच्या कोटींतील, त्यांचें स्मरण करावें, कीर्तनें करावीं, अनुकरण कधींहि करू नये, असें जर ठरविलें तर त्यात बुद्धिमत्ता आहे की नाहीं? आत्यंतिक त्याग न करता बेतावेतानें वागून जें काहीं पदरात पडण्याजोगें असेल तेवढें पाडून घेअून समाधान मानून घ्यावें आणि कबूल करावें कीं *आम्ही अलौकिक वीर नाहीं आहोंत*, आम्हाला याहून अधिक करवत नाहीं आणि तुम्ही सागतां तें व्यर्थ आहे हें स्पष्ट दिसतें. तेव्हा आमचें चाललें आहे तें वाअीट काय?" अशा तऱ्हेचा बुद्धिवाद बुद्धिमत्तेचें लक्षण नव्हे असें कोण म्हणेल?

खरोखर वस्तुस्थिति अशी आहे कीं केवळ बुद्धिमत्ता ही असली काय, नसली काय, सारखीच. जर बुद्धीच्या मुळाशीं ध्येयपरायणता, पराक्रम, वीर्य, तेजस्विता आणि व्यापक हृदय हीं असली, तरच बुद्धीचा योग्य रीतीनें अुपयोग होणार. या गोष्टी महाराष्ट्रांत आहेत किंवा नाहींत, हें तपासलें पाहिजे. महाराष्ट्राच्या जुन्या अितिहासांत या गोष्टी आज मुबलक सांपडतात, अेवढें ज्ञान पुरेसें नाहीं. या गोष्टी आज पटतात कीं नाहीं? हा प्रश्न आहे.

गीतेमध्यें ज्ञानाची व्याख्या देतांना भगवंतानीं केवळ नैतिक सद्गुणांचीच अेक माळ लावून दिली आहे. बुद्धिमत्तेला देखील वरील गोष्टी आवश्यक आहेत. या असल्या म्हणजे ध्येय समजण्याची दिव्य दृष्टि येते. ध्येयापर्यंत पोहोंचण्याचा हिय्या होतो, त्याचें साधन सांपडतें आणि समाजांत तितका जोमहि येतो. महाराष्ट्रांत ध्येयपरायणता आली, व्यापकता आली, अुदारता मुरली म्हणजे महाराष्ट्रांतला दीर्घोद्योग, महाराष्ट्राचा त्याग, या सर्वांचा अुपयोग होअील. ध्येयासाठीं जिवापाड मेहनत करणाऱ्या लोकांची कदर न करणारी आजची बेपर्वाअी गेली म्हणजे महाराष्ट्र बुद्धिमान् आहे असें ठरेल. इतर प्रांतांच्या मानानें आपल्यामध्यें काय आहे, काय नाहीं, हें पहात बसलों, तर अितर प्रांतांविषयीं तुच्छबुद्धि किंवा मत्सर वाढण्याचा संभव असतो. जीवनसाफल्याच्या दृष्टीनें आपली तयारी पूर्ण आहे किंवा नाहीं या दृष्टीनेंच पाहिलेलें बरें.

  

## ८५

मगनवाडी
६-७-३६

प्रिय पुंडलीकजी,

परवां येथें आमच्या मोठ्या हिन्दी-प्रचार-समितीची बैठक झाली. तीमध्यें महाराष्ट्र, मुंबअी, गुजरात, सिंध, आसाम, बंगाल, अुत्कल, या प्रांतांतील

हिंदीप्रचार सवटित करावयाचें ठरलें आता १५ जुलैपासून १ ऑगस्टपर्यंत महाराष्ट्रात हिंडणार. शंकरराव देव त्याच ठिकाणीं बरोबर असतील सांगलीचे गणूनाना कानेटकर दक्षिण महाराष्ट्रांत मदत करतील तुमच्या पुस्तकानें फार वाट पहावयास लावली आहे यांचें सर्टिफिकेट तुम्हांला यावयाचें का रक्त सळसळणाऱ्या 'तरुण भारताला' द्यावयाचें? ऐन्हाना पुस्तक विकून त्याचे पैसे पू बापूजींना परत द्यावयास हवे होते परवा रात्रीं पू बापूजी म्हणाले, कीं 'ते पैसे मला परत मिळाले पाहिजेत' माझ्या या दौऱ्यांत लोकांना काय सांगू? येणार, येणार, लौकरच येणार, पुंडलीकजींचें पुस्तक लौकरच येणार! असेंच सांगावयाचें राहिलें ना? थोडीं जरी पुस्तकें १५ जुलैपर्यंत तयार होतील तर चांगलें पण घाओी करण्यात चुकांचा सुकाळ होओील ही भीति आहे प्रकाशनें वेळेवर प्रगट न झालीं तर

'काल पिबति तद्रसम्'

मिरजेला गेल्याबरोबर तुमच्या 'तालीम संस्थे'ला निरोप पाठविला त्या दिवशीं कोणी भेटले नाहींत रात्रीं तुमच्या तात्याबुवांचें दर्शन झालें पण त्यांनीं बोलण्याला मला मुळींच अुत्तेजन दिलें नाहीं अितके लाजाळू कसे? त्यांना अनुनय हवा होता का? दुसरे दिवशीं तालीम संस्था पहावयास नेलें पण तेथें राष्ट्रीय सेवादल किंवा अशाच कोठल्याशा संस्थेच्यावतीनें ड्रिलच मला दाखवलें अिंग्रजींत हुकूम का, म्हणून विचारता 'आपल्या भाषेंत जोम नाहीं' अशा अर्थाचा बचाव मजपुढें माडण्यात आला तुमची संस्था, मग न दाखवावें तर काय करावें? अतिशय खिन्न होअून बाकीची तालीम पाहिली मल्लखांब, रोमन रिंग्ज, वगैरे गोष्टी फारच चांगल्या होत्या मला अुत्कृष्ट समाधान झालें सकाळीं अुठून मराठी भाषेच्या आणि हिंदी भाषेच्या अपमानाचा अपशकुन केला नसता तर बरें झालें असतें निर्माल्य मनोवृत्ति आणि तेज पुंज शरीरें हें मिश्रण मुळींच शोभत नाहीं यापेक्षा तेजस्वी मन आणि दुडाम्याचे हातपाय मला अधिक सहन होतील

मुरलीधरच्या वडिलांना अुभ्या अुभ्या भेटून आलों

वटसावित्रीच्या पूजेचीं का पुस्तकें होओीनात, स्वाभाविक कानडी भाषा असली तर मला बस आहे तत्त्वोद्योतक वगैरे पुस्तकें महाग तर आहेतच

आणि संस्कृत टीकाकाराच्या शैलीची कानडी त्यांत असणार तेव्हा तीं पुस्तकें न घेतलेलींच बरीं वत्सावित्री वगैरे बरीच स्वतांत मिळतील असें वाटतें खन्या किंमतीच्या चौपट किंमती पुस्तकावर छापल्या असतात रुपया, दोन रुपायांचीं पुस्तकें घेऊन पाठवा व्यासधर्म अजून आला नाहीं तुमचे हिंदी वर्ग चड पडता कामा नयेत शिकविणारा कोणी नसला तरी कोणी हुशार विद्यार्थ्यानें वाचनवर्ग व अध्ययनवर्ग चालू ठेवले पाहिजेत मॅकमिलनचें पुस्तक यथाकाळीं पाठवीनच सोबतचीं पत्रें ज्याचीं त्याना द्यावींत

किशोरलालभाओ म्हणत होते कीं, मुरलीधर घाटच्याचा अर्ज येणार अशी बातमी दोघाकडून आली आहे, पण अर्ज मात्र अजून येत नाही तेव्हा तो लवकर पाठवून द्यावा

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

## ८६

वर्धा

-७-७-३६

प्रिय पुंडलीकजी,

आज सकाळीं पू श्री गंगाधरराव येथें आले त्याना जाऊन भेटलों बोलताना गंगाधरराव आणि मी दोघेच होतों तुमची पुष्कळ निंदा करून घेतली मिरजेची तुमची 'मंडळी' आणि प्रेस या दोहोंविषयीची तुमची वफादारी अस्थानी आहे या लोकशासनधानें तुम्ही आपली आपुलकी वायाच खर्चीत आहात असें माझें मत आहे गंगाधररावाचें देखील आहे ही परिग्रह-फल्गुता ओळखल्यावाचून तुमच्या वाट्याला थोरपण कसें यावें, वगैरे वगैरे आम्ही बोललों

पटवर्धनाचा फारशी-मराठी कोश महाराष्ट्राला अितिहास-संशोधनाच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे तुम्ही बंगलूरच्या प्रो जम्बुनाथनचा आणि मुनओच्या

हिंदी ग्रंथ-रत्नाकरवाल्या नथुराम प्रेमींचा हे दोन कोश वापरावयास पाहिजे होते. अजून वापरा असें लिहिणार होतों पण नुकतीच मराठींत 'हिन्दी शिक्षक' म्हणून दोन-तीन पुस्तकें तयार झालीं आहेत. कोल्हापूरचें तुम्ही पाहिलेंच. त्यानंतर आणखी अेक तयार झालें आहे. तुमचें पुस्तक बरातीमागून घोडें झालें तर पू. बापूजींनीं अुसने दिलेले पैसे आपण परत कसे फेडणार?

चिकोडी तालुक्यांत १००० ची संख्या गांठलीत, तुम्हांला अभिनंदन!

तुमचें ता. १६ चें पत्र नानांच्या नांवानें लिहिलेलें आजच पोहोंचलें, त्याला तिकीट नसल्यामुळें दोन आणे भरावे लागले. दोन आण्यांचा दंड शेवटीं बापूजींना द्यावा लागला. त्याचें दुःख तर खरेंच, पण १६ ता. चें पत्र आज मिळतें याचें दुःख मात्र तुम्ही, नानांनीं व मी मिळून केलें पाहिजे. त्यांत तुम्ही राहून जाअूं नये म्हणून ही हकीकत सविस्तर कळविली आहे. तेव्हां पत्राप्रमाणें अुशिरा का होअीना तुमच्या वांट्याचें दुःख कराच.

मुरलीधरचा अर्ज पाठविल्याचें तुम्हीं आजवर मला कळविलें नाहीं, यामुळें जो तुमचेवर रागावलों, तो राग पुसून काढावयाला तुमचें हें पत्र खरासारखें अुपयोगीं पडलें.

चि. मोहनविषयीं तुम्ही मला कुमरींतहि 'भलामण' केली होती. आणि मी तुम्हांला सांगितलें होतें कीं तें अनावर आमच्या रानांतलें नव्हे. मोहन दिलदार दिसतो. त्याच्यांत मोकळेपणा आहेच. नाजूकपणा नाहीं. कणखर होअूं शकेल. माझ्या सहवासांत त्याच्या बुद्धीचा विकास होअील, हें सर्व खरें; तरी पण त्याचा वालीपणा मीं पत्करावा या श्री. जमनालालजींच्या सूचनेला मात्र मी विचारांतीं नकार दिला. माझ्या शेजारीं तो राहो, वाटेल तेवढा माझा सहवास मिळवो, त्यांत मी मनचोर होणार नाहीं. पण जबाबदारी मला घेतां यावयाची नाहीं. मी जबाबदारी घेण्याचा अिन्कार केला, याचें अेक कारण तुमच्या खाजगी पत्रांत आपोआप व्यक्त होतें. ज्याला हातगुण नाहीं अशा वैद्यानें धंदा चालवूं नये. वैदकीवर व्याख्यानें द्यावींत किंवा पुस्तकें लिहावींत. कारण तें काम अर्ध दगडांचें असतें. 'निम तबीब खतरे जान'.

*आतां तुमच्या खाजगी पत्राविषयीं—*

तपशीलाचें अुत्तर असें कीं नरहरीला शंकरराव देवांच्या मागणीवरून मी त्यांचेकडे लावून दिला. महाराष्ट्रांतील सर्वच पुढाऱ्यांच्या हिंमतीस त्याला दिला. त्याला कॉलेजची वाट बोरगांवच्या खोलींतून सांपडली नाहीं. पण पुण्याच्या वातावरण-शास्त्राच्या मुख्य कार्यालयाच्या जवळपासच तो रस्ता त्याला सांपडला.

. तुमचें खाजगी पत्र आलें त्यानंतर अेक तासांत कान्ति मजकडून आशीर्वाद मिळवून गेला. त्याच्या काकाच्या आर्थिक मदतीनें तो आतां मॅट्रिक होअून विलायतेला जाअून मोठा सर्जन होणार आहे. पू. बापूजींकडून त्याला मजजवळ घेतला होता. त्याचा नवा रंग दिसतांच त्याला बापूजींच्याकडे परत पाठविला. तेव्हां जरी करारार्थाला चिकटून दोषमुक्त होअूं शकतों तरी तुमची टीका मी पूर्णपणें स्वीकारतों. तुमची टीका माझ्या अंतर्मुख वृत्तीस तर नवीन नाहींच; पण माझ्या मित्रमंडळींत देखील ती शिळी आहे. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें वर्तुळ पुरें करावयाचें म्हणजे (वर्तुळ पुरें करणें असली गौरवाची भाषा कां वापरतां ! वाटोळें करणें असें म्हणाना !!) स्वामी, जुगतराम, चंद्रशंकर, ठाकुरभाअी, वगैरे किती तरी लोकांनीं तुमच्या बरोबर कॉलेजमध्यें नांवें घातलीं पाहिजेत.

शास्त्र म्हणतें, चार चौघांना बरोबर घेअून चालूं लागलांत तर सर्वांच्या चालीनें चाला. कांहीं थोडे लोक जर घाअी करून पुढें जातील तर अितर थोडे लोक (किंवा पुष्कळ लोक) तितक्याच घाअीनें अेक दोन पडाव मागेंहि जातील.

माझ्या संबंधानें माझे निरनिराळे मित्र काय म्हणतात तें थोडेंबहुत तुम्हांला ठाअूक आहे. मला अधिक ठाअूक आहे (आणि त्या सर्वांपेक्षां मी फारच पुढें जातों.) मला ठाअूक असलेलें सर्व तुम्हांला लिहिल्यास तुम्ही चिडून माझ्या मित्रांशीं भांडावयास निघाल.

आतां तुमच्या निदानाविषयीं-ज्यांना अुच्च साहित्यिक शिक्षण किंवा वातावरण हवें आहे पण मिळालें नाहीं, त्यांना कमी खर्चानें व माझ्या पद्धतीनें

तें मुबलक यावें असा माझा प्रयत्न असतो; पण मी स्वतः वाङ्मयाचा अुपासक नाहीं. संस्कृतीचा, विचाराच्या प्रसादाचा आणि सार्वभौम कल्पनांचा मी अुपासक आहें. पुरेशी तपश्चर्या केली असती तर या गोष्टींचा ऋषि झालों असतों.

मला वाटत नाहीं कीं, मी कोण्या पदवीधराची तरफदारी करतों. विद्यार्थ्यांनीं केवळ साहित्य वाचावें अथवा केवळ कामें करीत राहावें, हे दोन्ही 'अंत' मला मान्य नाहींत. मला दोहोंचा समन्वय अिष्ट आहे. योगवासिष्ठांत म्हटल्याप्रमाणें ज्ञान आणि कर्म या दोन्ही पंखानींच साधक पक्षी अुडूं शकतो. कदाचित् किशोरलालभाअी म्हणतात तें खरें असेल कीं 'तुमचेकडून घेण्याजोगें पुष्कळ असेल पण त्यांतून जें घेणें सोपें आहे, तेंच लोक अगोदर घेणार.' वि....विषयींचें माझें पृथःकरण मला कधींच बदलावें लागलें नाहीं, पण तें तुम्हांला लिहिणें योग्य होणार नाहीं.

भावाचें किंवा सहाध्यायाचें लग्न होतांच ज्याचें ब्रह्मचर्य गडबडतें आणि मनांत आणि जनांत 'कधीं करिती लग्न माझें तुज ठावें अिश्वरा' म्हणून जो गुणगुणूं लागतो, त्यानें मिशा पांढर्‍या झाल्या तरी खुशाल मॅट्रिकला बसावें. 'पूर्वाभ्यासेन तेनैव' पुढल्या जन्मीं तरी कॉलेजांत प्रवेश चांगला मिळेल. विद्या ही अनेक-जन्म-संसिद्ध असते, असें तुम्ही कितीं तरी लोकांना सांगितलें असेल. अगदीं गंगानाथ विद्यालयांत देखील मला विद्यार्थी मिळाले आहेत कीं, ज्यांचा प्रथमपासूनचा विचारच राष्ट्रीय शाळेंत फुकट शिकून सर्व विषय अुत्तम करून मग हळूच मॅट्रिकमध्यें सरकावें असा होता. हे सर्व माझ होते, असें मी कबूल करतों. तुम्ही आणि कदाचित् त्या शाळेंत शिकलां नाहीं, त्याला काय करावें ? दुर्दैव तुमचें !

फादर अेल्विननें लिहिलें आहे कीं "खेडवळ विद्यार्थी मजकडे येवोत, हायस्कूलपर्यंत गेलेले देखील येवोत, पण जे कॉलेजांत गेले ते माझ्या कामाचे राहिले नाहीत." त्यांनीं अनुभवानें लिहिलें आहे. आतां मी लिहिणार आहे कीं ज्यांनीं कॉलेज संपविलें नाहीं ते मजकडे न येवोत. आपल्याला आपले 'वृद्धा नारी पतिव्रता' होअून येणारेच हवे आहेत. दोघांचा अनुभव अेकत्र केला म्हणजे मग 'अुर्ध्वायै दिशे ब्रह्मणे नमः'

सुदैवानें टपालाची वेळ झाली म्हणून येथेंच बंद करतों नाहींतर माझें आत्मपरीक्षणच लिहून पाठविलें असतें

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

---

# ८७

वर्धा

२५-२-३७

प्रिय पुटलीकजी,

तुमचा-आमचा संबंध असा आहे कीं तुम्हीं निःसंकोच माझेकडून वाटेल तें काम घ्यावें आणि मी माझ्या शक्तीप्रमाणें आणि अवकाशाप्रमाणें करावें मधून मधून चिडण्याचा हक्क मला माझ्या वयाप्रमाणें तुम्हीं दिला पाहिजे माझी समजूत आहे कीं गंगाधरराव हल्लीं तुमच्यावर चिडत नाहींत तेव्हां तो हक्क मजकडे पाठवून द्याल तर तुम्हाला ओकें ओकें वाटणार नाहीं.

तुम्ही हिंदी-प्रचारासंबंधानें मन्दोत्साह होणें म्हणजे माझीं पखें कापून टाकण्यासारखें आहे तसें होताच कामा नये बेळगाव जिल्ह्यासाठीं अशा समितीची घटना लौकरच सुचवून पाठवीन सत्यनारायणांना तयार करावयाला सांगितली आहे

तपास करता समजतें कीं, त्यानीं टंडनजींना पत्र लिहिलें नव्हतें त्याचा अंदाज आहे कीं त्यानीं रामदासना पत्र लिहिलें होतें तें बाबाजींनीं टंडनजींना पाठविलें असेल तेथून टंडनजींना कांहीं लिहू नये, प्रत्यक्ष भेटींत मी त्याना योग्य तें कळवावें, असें आमचें ठरलं होतें मलाहि आश्चर्यच वाटलें होतें कीं, सत्यनारायणजींनीं टंडनजींना कसें लिहिलें ?

मी १ मार्चला कलकत्त्याला जाणार रामकृष्ण शताब्दिउत्सवमंडळातर्फे सर्वधर्म-परिषद आहे, तिचेसाठीं जाणार. १५ मार्चच्यापुढें मी मद्रासकडे

असणार. हिंदी साहित्यसंमेलनाच्या अधिवेशनाला तुम्ही आलेंच पाहिजे. पू. गंगाधररावांना माझ्या वतीनें सांगा कीं, मद्रासला तुमचें येणें अपरिहार्य आहे. संमेलनानंतर आणि गांधीसेवा-संघाच्या कुमरी संमेलनापूर्वी दक्षिणेकडेच कोठेंतरी फिरावें असें वाटतें. कदाचित् कर्नाटकांत फिरलों तर कारवारची बाजूहि घेअीन.

माझा सहवास तुम्हांला कधींच बाधूं नये हें कसें शक्य आहे? तेव्हां हिंदीच्या बाबतींत तुम्हीं निरुत्साही होअून चालावयाचें नाहीं, हें फिरुन सांगतों.

आपल्या तिकडे रेडे-अनसाच्या दोऱ्या मंगळसूत्रासाठीं मिळतात. त्या सहज मिळतील तर पाकिटांतून Sample Post नें पाठवून या. रेटियाच्या चाकेला त्याचे चमरखे बनविणार. त्यांना तेल पाजवून त्यांचेवर चात चालती करावयाची आहे.

सीरियाचा महाकवि खलील जिब्रान अरबी भाषेंत कविता करुन मल्यांतीला आला होताच. त्यानें अिंग्रजींतहि गोड गोड पुस्तकें लिहिलीं आहेत. याच्या Madman चें भाषांतर तुम्ही 'विहंगमां'त पाहिलें असेल. याचीं अेकदोन वाक्यें खालीं देत आहें. तुम्हांला तीं आवडतील.

Pity the nation that is full of beliefs and empty of religion.

Pity the nation that wears a cloth it does not weave and eats a bread it does not harvest.

Pity the nation that acclaims the bully as hero.

Pity the nation that boasts not except among its ruins and will rebel not, save when its neck is laid between the sword and the block.

Pity the nation whose statesman is a fox, whose philosopher is a juggler and whose art is the art of hatching and mimicking.

आणि शेवटीं,

Pity the nation divided into fragments, each fragment deeming itself a nation

तुमच्या बुक पोस्टात खाजगी पत्रहि असल्यानें त्याचे पैसे मला येथें भरावे लागले ! !

जवाहरलालजींच्या आत्मकथेमध्यें भाषा व लिपीसंबंधानें अेक प्रकरण आहे, त्यांतील आवश्यक भाग तुमच्या प्रस्तावनेंत घाल तर चांगलें

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

---

## ८८

*गांधीजयंति, १९३७*

प्रिय पुंडलीक,

तुमचा प्रश्न फारच बिकट आहे तरीहि विशिष्ट ध्येय डोळ्यापुढें ठेवून ज्यानें आयुष्याचीं निदान पंचवीस वर्षें काढलीं त्याला अशा प्रश्नाचें अुत्तर देता आलेंच पाहिजे असा माझा अभिप्राय असल्यामुळें थोडासा प्रयत्न करतों

शरीराशीं आपला जन्मापासून मरणापर्यंतचा अखंड संबंध असूनहि आपलें शरीर कसें चालतें, शरीरांत वरें वाअीट काय आहे व शरीर कोठवर आलें आहे, याची पूर्ण दाद आपल्याला नसतेच स्थूल शरीराची जर ही स्थिति, तर स्वतःचें मन, त्या मनात दडून रहाणाऱ्या वासना व आकांक्षा या सर्वांची नित्तनातमी आपल्याला कोठून असणार ? बाह्य जगाचा जसा आपल्याला ठाव लागत नाहीं, तसाच आपल्या मनाचाहि ठाव लागणें दुरापास्त असतें *आणि आपलें प्रत्येक मन म्हणजे बाह्य जगाअेवढेंच मोठें व त्याहून गूढ* असें जग असतें

आपण जगाला फसविण्याचा प्रयत्न करतों, त्याहून स्वतःला फसविण्याचा प्रयत्न अधिक करितों. जगाला आपल्याविषयीं आस्था वेताचीच असते, त्यामुळें फसणें, न फसणें याची किंमत जगाला फारशी नसावयाची. आपण स्वतःचे फार लाडके असतों. त्यामुळें स्वतःला फसविण्याचा आणि स्वतःचा अभिप्राय स्वतःविषयीं फारच अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न अव्याहत चालू असतो. अशा स्थितींत, जसें दुसऱ्याविषयीं बोलण्यांत अेकप्रकारचा अन्याय होण्याचा संभव असतो, तसेंच स्वतःविषयीं बोलण्यांतहि दुसऱ्या प्रकारचा अन्याय होण्याचा संभव परिपूर्ण आहे.

आपलें आचरण आर्य असो वा अनार्य असो, जागरूकपणें स्वतःवर चौकी पहारा ठेवावा व निदान स्वतःला ओळखून असावें, असा माझा प्रथम निश्चय झाला व त्यामुळें जी वृत्ति जबरदस्तपणें बहिर्मुख होती ती अंतर्मुख केली. जे विचार परस्मैपदी होते त्यांना आत्मनेपदी केले. हा प्रयत्न आजतागायत चालूच आहे. मूळ स्वभाव परस्मैपदी व सर्व साधना आत्मनेपदी, अशी स्थिति असल्यानें दोन्ही बाजूंचा फायदा मिळूं लागला आणि त्यामुळें वृत्ति गूढहि बनली आणि व्यापकहि बनली.

माझ्या विचारसरणींतहि परस्मैपदी व आत्मनेपदी असा भेद आहे. मी स्वतःसाठीं जेव्हां विचार करतों आणि निर्णय ठरवितों, तेव्हां त्याची पद्धति अगदीं निराळी असते. ती तशीच लोकांपुढें मांडली तर बरेच लोक मला वेड्यांत काढतील. पण माझे निर्णय अगदीं शुद्ध आहेत, असा आत्मविश्वास मला माझ्या पद्धतीनेंच मिळतो. पण तीच गोष्ट लोकांपुढें मांडून त्यांना पटवून द्यावयाची असते, तेव्हां विचाराची व अनुमान-शृंखलेची मांडणी परस्मैपदी असते. येथें दुसऱ्याची मनोरचना ध्यानांत घ्यावी लागते, दुसऱ्यांना बौद्धिक व हार्दिक समाधान किंवा तृप्ति कशी प्राप्त होओील याचा विचार करावा लागतो. पुष्कळ वेळीं माझ्यामध्यें ही परस्मैपदी तर्पणशक्ति चांगल्या प्रमाणांत दिसून येते; मात्र माझ्या आत्मनेपदी जगाचा रहिवासी मी अेकटाच असल्यानें जागृतीचे सर्व तास अव्याहत मित्रांच्या सहवासांत असूनहि मी अेकाकीच आहें व म्हणूनच मानसिक शांति टिकविणें बरेंचसें सोपें जातें. मी

आणि शेवटीं,

Pity the nation divided into fragments, each fragment deeming itself a nation.

तुमच्या बुक पोस्टांत खाजगी पत्रहि असल्यानें त्याचे पैसे मला येथें भरावे लागले !!

जवाहरलालजींच्या आत्मकथेमध्यें भाषा व लिपीसंबंधानें अेक प्रकरण आहे, त्यांतील आवश्यक भाग तुमच्या प्रस्तावनेंत घाल तर चांगलें.

काकाचा

सप्रेम वंदे मातरम्

## ८८

गांधीजयंति, १९३७

प्रिय पुंडलीक,

तुमचा प्रश्न फारच बिकट आहे. तरीहि विशिष्ट ध्येय डोळ्यापुढें ठेवून ज्यानें आयुष्याचीं निदान पंचवीस वर्षे काढलीं त्याला अशा प्रश्नाचें अुत्तर देतां आलेंच पाहिजे असा माझा अभिप्राय असल्यामुळें थोडासा प्रयत्न करतों.

शरीराशीं आपला जन्मापासून मरणापर्यंतचा अखंड संबंध असूनहि आपलें शरीर कसें चालतें, शरीरांत बरें वाअीट काय आहे व शरीर कोठवर आलें आहे, याची पूर्ण दाद आपल्याला नसतेच. स्थूल शरीराची जर ही स्थिति, तर स्वतःचें मन, त्या मनांत दडून रहाणाऱ्या वासना व आकांक्षा या सर्वांची खिंतबातमी आपल्याला कोठून असणार? बाह्य जगाचा जसा आपल्याला ठाव लागत नाहीं, तसाच आपल्या मनाचाहि ठाव लागणें दुरापास्त असतें आणि आपलें दरेक मन म्हणजे बाह्य जगाअेवढेंच मोठें व त्याहून गूढ असें जग असतें.

आपण जगाला फसविण्याचा प्रयत्न करतों, त्याहून स्वतःला फसविण्याचा प्रयत्न अधिक करितों. जगाला आपल्याविषयीं आस्था बेताचीच असते. त्यामुळें फसणें, न फसणें याची किंमत जगाला फारशी नसावयाची. आपण स्वतःचे फार लाडके असतों. त्यामुळें स्वतःला फसविण्याचा आणि स्वतःचा अभिप्राय स्वतःविषयीं फारच अनुकूल करुन घेण्याचा प्रयत्न अव्याहत चालू असतो. अशा स्थितींत, जसें दुसऱ्याविषयीं बोलण्यांत अेकप्रकारचा अन्याय होण्याचा संभव असतो, तसेंच स्वतःविषयीं बोलण्यांतहि दुसऱ्या प्रकारचा अन्याय होण्याचा संभव परिपूर्ण आहे.

आपलें आचरण आर्य असो वा अनार्य असो, जागरूकपणें स्वतःवर चौकी पहारा ठेवावा व निदान स्वतःला ओळखून असावें, असा माझा प्रथम निश्चय झाला व त्यामुळें जी वृत्ति जबरदस्तपणें बहिर्मुख होती ती अंतर्मुख केली. जे विचार परस्मैपदी होते त्यांना आत्मनेपदी केले. हा प्रयत्न आजतागायत चालूच आहे. मूळ स्वभाव परस्मैपदी व सर्व साधना आत्मनेपदी, अशी स्थिति असल्यानें दोन्ही बाजूंचा फायदा मिळूं लागला आणि त्यामुळें वृत्ति गूढहि बनली आणि व्यापकहि बनली.

माझ्या विचारसरणींतहि परस्मैपदी व आत्मनेपदी असा भेद आहे. मी स्वतःसाठीं जेव्हां विचार करतों आणि निर्णय ठरवितों, तेव्हां त्याची पद्धति अगदीं निराळी असते. ती तशीच लोकांपुढें मांडली तर बरेच लोक मला वेड्यांत काढतील. पण माझे निर्णय अगदीं शुद्ध आहेत, असा आत्मविश्वास मला माझ्या पद्धतीनेंच मिळतो. पण तीच गोष्ट लोकांपुढें मांडून त्यांना पटवून द्यावयाची असते, तेव्हां विचाराची व अनुमान-शृंखलेची मांडणी परस्मैपदी असते. येथें दुसऱ्याची मनोरचना ध्यानांत घ्यावी लागते, दुसऱ्यांना बौद्धिक व हार्दिक समाधान किंवा तृप्ति कशी प्राप्त होईल याचा विचार करावा लागतो. पुष्कळ वेळीं माझ्यामध्यें ही परस्मैपदी तर्पणशक्ति चांगल्या प्रमाणांत दिसून येते; मात्र माझ्या आत्मनेपदी जगाचा रहिवासी मी अेकटाच असल्यानें जागृतीचे सर्व तास अव्याहत मित्रांच्या सहवासांत असूनहि मी अेकाकीच आहें व म्हणूनच मानसिक शांति टिकविणें बरेंचसें सोपें जातें. मी

तारुण्याच्या अगदीं सुरवातीस असतांनाच अेक महान् संकल्प केला. त्या वेळचे शब्द अिंग्रजी होते ते तसेच येथें देतों.

I have a life to waste on experiments.
I shall see to it that
I don't build a career.
But if a career builds of itself and comes
in the way of my experiments,
I shall see to it that it is shattered.
My gains shall all be subjective.

अशा रीतीनें स्वतःपुरता मी प्रयोगवीर झालों. माझ्या हातून सेवा घडो वा न घडो; पण माझ्या दोषामुळें जगाची असेवा न होवो अेवढी चिंता मात्र सतत असते. यामुळें स्वतःच्या लाभहानीच्या बाबतींत अगदीं बेफिकीर व अितरांच्या लाभहानीच्या बाबतींत यावत्शक्य सावधान, अशी माझी स्थिति आहे.

मजविषयीं नेहमींच गैरसमज होत असतात. पुष्कळ वर्षं यामुळें मी आंतून दुःखी असें. पुढें पाहिलें कीं, प्रत्येकाची दुनिया निराळीच असते. तेव्हां गैरसमज असणें हें मुळींच आश्चर्यकारक नसून, सार्वत्रिक गैरसमज नाहीं, हेंच अेक मोठें आश्चर्य वाटूं लागलें. खरोखर चंद्राची पाठ जशी आपल्याला दिसत नाहीं. त्याचप्रमाणें आपल्या वृत्तीच्या बाहेर जें कांहीं म्हणून बाह्यजगत् आहे तें आपल्याला दिसतां, कळतां आणि आकळतां येअूं नये. पण तसें नाहीं असें पाहून मी सिद्धांत बांधला कीं, ज्याप्रमाणें जगांत अेकच आत्मा आहे पण हें आत्मैक्य सहजासहजीं अनुभवास येत नाहीं, त्याचप्रमाणें जगांत मनहि सर्वत्र अेकच आहे, बुद्धि अेकच आहे, आणि हृदयहि अेकच आहे, सर्व अंतर्बाह्य विश्व अेकरूपच आहे. या सिद्धान्तानें मला नेहमींच मोठी शांति मिळाली आहे. या सिद्धांतामुळें माझा राग तर बहुतेक नाहींसा झाला.

कॉलेजमध्यें मला साहित्याची गोडी व गणित चांगलें असल्यामुळें तोच विषय घेअून पुष्कळ मार्क मिळवून परीक्षेंत वर येण्याचा मोह कमी नव्हता.

असें असूनहि पूर्ण विचारांतीं मी तर्क आणि तत्त्वज्ञान हाच विषय घेतला. त्या वेळीं हा विषय पसंत करण्याचें कारण अध्यापक ओकनीं विचारलें असतां मी जें अुत्तर दिलें, तेंहि माझी जीवनदिशा सुचविणारेंच होतें. मी म्हणालों :

"I think a lot, and in innumerable directions; but it leads to no-where. There is no definiteness. I am anxious, therefore, to know the various types of thinking. I want to be familiar with all the avenues of thought. " ही त्या वेळची भाषा आहे. आज कदाचित् याहून जास्ती चांगल्या भाषेंत हें मांडतां येअील. पण भाषेंतच स्वाभाविक खोंच आहे.

वृत्ति अंतर्मुख होण्याचें दुसरें अेक कारण लहानपणींच अुत्पन्न झालें होतें. घरीं सहा भावांत मी सर्वांत धाकटा. मातोश्रींनीं माझ्यापुढें लक्ष्मणाचा आदर्श ठेवला होता. अर्थात् मजहून मोठ्या पाच रामचंद्रांची सेवा करणें व त्यांच्यापाशीं निष्ठा सांभाळणें माझें कर्तव्य होतें. वयाच्या मानानें हा प्रयत्न मी प्रामाणिकपणें केला; पण दुर्दैव माझें कीं सर्व वडील बंधूंनीं माझ्या अभ्यासाला थोडी फार मदत केली असली तरी, विकासाला कोणींच मदत केली नाहीं. त्याना विकासाची फारशी कल्पनाच नसावी. वडील भावाचा हक्क म्हणून दादागिरी चालविण्याची हौस मात्र प्रत्येकाला. त्यामुळें ज्या मानानें त्यांची नालायकी आणि अुपेक्षा, तितकेंच स्वातंत्र्य मला लाभलें होतें.

अर्थात् लहानपणीं जेव्हां प्रेम, प्रसन्नता व मोकळेपणा, हीं अधिकाधिक हवीं असतात, त्या वेळींच माझेवर अेक दडपण पाडलें गेलें. बाह्य विकास बराचसा खुरटला आणि वृत्ति आतल्या आंत अवकाश शोधूं लागल्या परिणाम असा झाला कीं, स्वभावांत नकळत कृत्रिमता येअूं लागली. आत्म विश्वासाचें मातेरें झालें; स्वाभिमान बोथट झाला; पण त्याबरोबरच शांतपणें निरीक्षण करण्याची व तटस्थपणें निर्णय बांधण्याची संवय लागली. पुष्कळसे प्रयोग प्रत्यक्ष करता न आले, तरीहि ते मनानें करून पहावयाचे; मूर्तिपूजा न करतां आली तरी जशी मानसपूजा करतां येते त्याप्रमाणें मानस-विषयसेवन, मानस-पराक्रम, मानस-प्रयोग, मानस-योजना, वगैरे गोष्टी चाडल्या. जीवनाचा,

मोठा भाग मानासिक क्षेत्रांतच विकास पावू लागला. यामुळें कल्पनाशक्तीचा असाधारण परिपाक झाला. पण हरअेक गोष्ट अनुभवाच्या कसोटीला कसून पाहाण्यचें मात्र राहून गेलें व त्यामुळें स्वभावांत किंवा बुद्धींत विलक्षण तरतरी व हास्यास्पद् बावळटपणा यांचें मिश्रण दिसूं लागलें. लोकांच्या या दोहोंपैकीं कोठली तरी अेक बाजू विशेष लक्षांत येअून त्यांचें वर्तन परस्पर-विरोधी होअूं लागलें. यामुळेंहि समाजांत वागण्याच्या बाबतींत आत्मविश्वास बराच कमी झाला. हा बावळटपणा काढून टाकण्यासाठीं मी आटोकाट प्रयत्न चालविले. कोणत्याहि प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी किती बाजूंनीं विचार करणें शक्य आहे, हें मी प्रथम पाहूं लागलों. यामुळें अेकच प्रश्न अनेक रीतीनें तपासण्याची संवय लागली.

स्वत: बरेंच सहन केलें असल्यानें माझ्यामध्यें सहानुभूतीची मात्रा वाढली. अुदाहरणार्थ स्त्रियांचें जीवन परस्वाधीन; आअीबाप, भाअू, सासुसासरा, नवरा, दीर-नणंदा, सर्वांचीच कुर्वोडी त्यांना सहन करावी लागते, यामुळें त्यांची स्थिति कशी होत असेल याची बरोबर कल्पना येअून त्यांच्या-विषयींची सहानुभूति वाढली. घरांत मी सर्वांत लहान असल्यानें माझ्यासमोर सर्वच मंडळी मोकळेपणानें बोलत. 'हा लहान, याला काय कळतें,' हीच सर्वांची भावना. आणि बारीक सारीक कट जे सर्वत्र चालू असतात त्या सगळ्याच कटांत माझा अुपयोग सर्वत्र करून घेतला जात असल्यानें सर्व बाजूंशीं सहानुभूति मी वाढवूं शकलों; पण त्याबरोबर लोक कसे अेकांगी असतात, कसे आंधळे असतात, आवेशांत येअून कसे फसतात, हें सहज लक्षांत आलें व त्यामुळें लहानपणींच आंधळ्या अुत्साहाची भूमिका सुटून अेकप्रकारचा पोक्तपणा आंगीं आला. पोरकटपणा असा मला फारसा शिवलाच नाहीं व म्हातारपणीं भ्रमनिवृत्ति झाल्यानें जो विषाद येतो तो विषादहि मला कधीं बाधला नाहीं.

मी प्रथम वाढविले ते कौटुंबिक सद्गुण. आज्ञाधार कव्हावें, सेवापरायण असावें, स्वतांच्या स्वार्थाचा विचार काढून टाकावा, हे तीन गुण लहानपणीं अुत्कटतेनें वाढले. यानंतर सृष्टिनिरीक्षणाची गोडी थोडीशी अुशीरानें आली व ती अजून वाढत्या प्रमाणावरच आहे. कारवारला हिंदुस्कूलमध्यें शिकत असतांना

नैतिक जीवनाची महत्ता प्रथम नजरेस आली. धर्मनिष्ठा व धार्मिकता हीं मातापित्यापासून मुबलक प्रमाणांत मिळाली. स्वभावांत प्रयोगवीरता असल्यानें धार्मिक श्रद्धा वेळोवेळीं परजली गेली. प्रथम वाटे, अद्वितीय भक्त व्हावें; पुन्हां वाटे योगी होऊन अनेक सिद्धि मिळवाव्यात व जगाचें दुःख दूर करावें. कॉलेजमध्यें गेल्यानंतर स्वातंत्र्यनिष्ठा वाढली व क्रांतिकारी विचार दृढ झाले. पण त्याबरोबरच बुद्धीची उपासना वाढल्यामुळें नास्तिकता व संशयवाद यांनीं घेरलें.

पूर्वपीठिका चांगली असल्यामुळें नास्तिकता व संशयवाद यांचा मला पुष्कळच फायदा झाला. त्या कालाविषयीं मला आजहि पश्चात्ताप नाहीं, त्या स्थितीची लाज वाटण्याचेंहि कारण पडलें नाहीं. यथाकाळीं पुनः धार्मिक भूमिकेवर आलों. लहानपणची धर्मनिष्ठा कर्मकांडी आणि भाविक होती. नैतिक जीवनाची महत्ता त्या वेळीं साक्षात् झाली नव्हती. आतां नैतिक व आध्यात्मिक जीवन हेंच जीवनसर्वस्व आहे, असें कळून आलें. लहानपणीं सृष्टिनिरीक्षण व नवेनवे अनुभव यांच्या आवडीनें प्रवासाची गोडी होती; मोठेपणीं त्या वृत्तींत समाजनिरीक्षण, तीर्थयात्रा, स्थापत्याच्या निरीक्षणाची गोडी, वगैरे गोष्टींची भर पडली.

याच काळीं संस्कृति म्हणजेच जीवनाचा परिपाक या बाजूकडे मन वळलें व जीवन सर्व बाजूंनीं समृद्ध झालें पाहिजे, असें वाटूं लागलें. स्वामी विवेकानंद, सिस्टर निवेदिता, आनंदकुमारस्वामी, लाला हरदयाळ व रवींद्रनाथ ठाकूर यांच्या विचारांचा पगडा मनावर विशेष बसला. स्वातंत्र्य-प्राप्ति, संस्कृतीचा विकास, आध्यात्मिक जीवन, सेवापरायणता, या सर्व वस्तु जीवनाच्या केंद्रांत येऊन बसल्या व यातून साक्षात्कार झाला कीं मनुष्याचा सर्वोच्च व्यापार म्हणजे शिक्षण होय. शिक्षण हेंच सर्वोच्च, सर्व-संपूर्ण व नित्यनूतन असें वाढत्या अंगाचें जीवनदर्शन आहे. अर्थात् या प्रवृत्तीलाच स्वतःचें जीवन अर्पण करणें हें स्वाभाविक, क्रमप्राप्त व अपरिहार्य झालें.

तेवढाच आराम मिळविला आहे. शंकर, वाळ, हक्कानें स्वदस्तुरचें पत्र मागतात मग तुम्हालाच कां न लिहावें? हाही अेक विचार मनांत येतोच. स्वहस्तें पत्रें लिहिण्यांत मी जरी पराभूत झालों आहें तरी माझी प्रकृति बरीच सुधारली आहे. गरजवंत व आजारी यांची स्थिति सारखीच. यामुळें कालपासून येथें मजजवळ असलेला नथु (नवजीवनमधील नोकर) याचेकडून छातीला औषधी तेल चोळून घेअूं लागलों आहें. विशिष्ट प्रेमाच्याच माणसांचा अंगास स्पर्श झालेला खपावा हें संन्यासवृत्तीला योग्य नव्हे, अशीहि तर्कणाहि स्वतःशीं केली.

नीट बरे होअीपर्यंत काम करण्याची घाअी करूं नका. पण मग कांहीं ना कांहीं काम हातीं घ्याच. काम नसलें कीं मनुष्य लौकर म्हातारा होतो व आत्मविश्वास गमावून बसतो. अंत्यज शाळेंत तुम्हाला वाव नाहीं हें समजलें. कांहीं हरकत नाहीं. सेनापति बापटांविषयीं तुम्हाला आदर आहे. त्यांचा सेवाधर्म केवढा अुज्ज्वल! गटारें साफ करीत असत. तुम्ही बागेंत काम करा. गांवांतील कचऱ्याचे कोपरे साफ करा. आमच्या नरहरीभाअींनीं स्वतःच्या गांवीं असें करून फारच अुत्तम परिणाम घडवून आणला. तुम्हांला ठाअूक आहे, कीं मी जरी फार वाचत नसलों तरी वाचनाच्या विरुध्द मी खास नाहीं. तरी तुमचें वाचन कदाचित् वंध्य असावें असें मला वारंवार वाटतें. कां कुणाला ठाऊक. तुम्ही लोक शास्त्रप्रामाण्यवादी. शास्त्रार्थ करतां करतां बुद्धि बोथट होते असें मला वाटतें. परसेवो याचा अर्थ पर-सेवा असा करून सबंध लेख तुम्ही कसा लावला असेल याचेंच आश्चर्य वाटतें. असली करामत किंवा कसरत शास्त्रीलोकच करूं जाणतात! परसेवो शब्द संस्कृत प्रस्वेदपासून आला आहे. परसेवो म्हणजे घाम.

शास्त्रांचा अर्थ करतांना किंवा वाक्याचा काय अर्थ होअूं शकतो याचा विचार करतांना, तत्त्व काय असूं शकेल याचाच विशेष विचार केलेला चांगला. यालाच अेकप्रकारें आत्मस्वातंत्र्य म्हणतां येअील. अर्थ पटावयाचा नसून तत्त्व पटलें पाहिजे.

तुम्ही निकरानें स्वतःशीं लढत झुंजलीलाच राहिलां आहांत हें माझ्या मतें अुत्तम केलें. हीहि तपश्चर्या आहे. अितरांना ती न दिसो. तुम्हा कुमरी

आश्रमाचे घटक आहाहि आणि नाहींहि "जाळूनी संसार, बैसलों अगणीं" अशा वृत्तीनें तुम्ही कौटुंबिक पाश तोडले आहेत गंगाधरराव त्याच पथात आहेत अशा परिस्थितींत तात्त्विकदृष्ट्या आश्रमवासी आहात व व्यवहार-दृष्ट्या तुम्ही आश्रमाचे घटक नाहीं आहात व तेंच योग्य आहे घर सोडलें व मठ धरला ही स्थिति तुम्हाला असह्यच व्हावयाची तुमच्यासारख्या आध्यात्मिक वृत्तीच्या माणसाला रोज वर चढल्यावाचून कसें स्वस्थ बसवणार ? स्वराज्यात तुम्हाला मोक्ष दिसतो हें खर, पण अुपनिषद, गीता, याचा अभ्यास प्रवचनकार, पुढारी होण्याच्या अुद्देशानें तुम्ही खास करीत नाहीं धर्मतत्त्व समजावें, तदनुसार आचरण घडावें व जीवन सफल व्हावें हाच तुमचा अुद्देश वाचन, मनन यानें विचार सुचतात, दृष्टि निवळते, पण कोणत्याहि विचाराचा, कल्पनेचा साक्षात्कार कर्माच्या द्वारा होतो पित्त व हवा याच्या योगानें ज्याप्रमाणें अन्नाचें रक्त होअून अन्न आत्मसात् होतें, त्याचप्रमाणें ज्ञान कर्माच्या सहाय्यानेंच आत्मसात् होतें म्हणूनच गीतेनें कर्मावर इतका भर दिला आहे ज्ञानाचा खरेपणाची कसोटीहि कर्मच आहे चतुर पुरुष भाषेच्या जोरावर बसेल तो विचार श्रोत्या वाचकाच्या मनावर ठसवितील व मोह पाडतील पण कर्माच्या कसोटीवर खरेंखोटें याची पारख अचूक होते व समाधानहि कर्मांतच आहे

माझा मूळ मुद्दा सोडून ह अुगाच प्रवचन झालें तें सोडून या

'नूपुर' पहावयास मिळालें 'नूपुर' कारानीं त्यात माझा प्राजळ अभि-प्राय लोकाच्या नजरेस पडण्यासाठीं मागितला आहे ! तुमच्या समाधानार्थ मी अभिप्राय दिलाहि असता पण कवितेच्या क्षेत्रात अभिप्राय देणारा मी कोण ? महाराष्ट्र मला ओळखत नाहीं म्हणून 'सत्याग्रही वीर,' 'देशभक्त,' 'महात्माजींचे पट्टशिष्य', 'अुजवा हात,' निदान 'सत्याग्रहाश्रमवासी' प्रथम माझीच ओळख करून द्यावी लागते अैवगुणविशिष्ट काकासाहेब या पुस्तका-संबधानें असें असें म्हणतात, असा विस्तार करावा लागतो मला या सर्व प्रकाराची लाज वाटते कवींची कविता मासिकातून येते लोक तिला प्रत्यक्ष ओळखतात व मग कवितासंग्रह आपोआप स्वत:च्या जोरावर प्रसिद्ध होतो मी अभिप्राय द्यावयाचा नाहीं असेंच ठरविलें आहे

'काव्य' बरवर पाहून गेलों व एका रसिक मित्राला पहावयाला दिलें आहे परत आलें म्हणजे काळजीपूर्वक वाचीन मला कविता आवडली शिखरिणी, स्रग्धरा ही माझीं आवडतीं वृत्तें त्यातच कवीचा हातखंडा आहे विषय काव्याला शोभतील असेच बहुतेक घेतले आहेत व कवि हृदयाहि ठिकाठिकाणीं दिसून येतें पण कवीला किंवा प्रकाशकाना कविहृदयापेक्षा वृत्तरचनाकौशल्यच अधिक महत्त्वाचें वाटत असावें कोल्हटकराना लिहिलेलें गचाळ पत्र कशाला छापलें? कवीनें त्या वळीं सहज हौसेनें किंवा पोरबुद्धीनें लिहिलें किंवा रचलें, पण छापून आज काय मिळविलें? आपल्या रसिकतेचें प्रदर्शन! हजार उत्तम उत्तम अभिप्राय धुवून टाकण्याला ही एक कविता बस आहे

'गोवा' कुंभाराची कविता तुम्हाला फार आवडली असेल आझून आझून राज्यकर्त्याविषयींचा अनादर व्यक्त करणें आजकाल फार बोकाळलें आहे त्यापैकींच ही कविता आहे मला तींत तेजस्वीपणाचा अभाव दिसतो मराठी भाषेंत असलें वाङ्मय तयार करून आपण भाषेचा अपमान करतों व राष्ट्राचें शील अतेजस्वी करतों कायद्याशीं असला लपंडाव खेळणारा कवि राष्ट्राच्या दुःखाचा व अपमानाचा अपमान करतो हें तुम्हाला कधीं समजणार? अशानें का कधी राष्ट्र वर येतें? गुलामी भ्याडपणाचें कौतुक तें काय करावयाचें? ह्यात लोकजागृति मुळीच नाहीं आणि मूळ पौराणिक गोष्टीचे विनाकारण हाल! समग्र कविता वाचून मग विशेष लिहीन वरील टीकेवरून निथळून जाऊ नका कवीविषयीं माझा समभाव आहे व त्याना तुमच्यामार्फत एक विस्तृत पत्रहि लिहीन

हिंदी कोशाच्या बाबतींत तपास करतों अजमेरला लिहीत आहें व स्वामी येथें उद्या परवा येणार आहेत त्यानाहि पुन्हा आठवण देईन

*येथें ज्या प्रकारचीं पुस्तकें मी गोळा केलीं आहेत तीं तुम्हाला आवडण्या-*सारखीं नाहींत याल तेव्हाच पसंत करा

ब्रह्मचर्यावर अजून एक ओळहि लिहिली नाहीं निरनिराळ्या वेळीं विद्यार्थ्यांना लिहिलेल्या पत्राच्या धर्तीवर एक पत्रमाला लिहिणार आहें. म्हणजे याविषयींचें गांभीर्य, पावित्र्य व खासगीपणा कायम राहील

चि. बाळ बारडोलीला आहे शंकर भावनगरला राष्ट्रीय मॅट्रिकची तयारी करीत आहे शंकरमध्यें भूतकाळ विसरून जाऊन वर्तमानकाळाच्या आनंदात एकरस होण्याची वृत्ति आहे त्यामुळें त्याची मला चिंता नाहीं

माझ्या या पत्रावरून तुमची खात्री झाली असेल कीं तुम्ही खिन्न आहा असें मी मानून बसलों नाहीं तुम्हांत कटुकवृत्ति आहे, हें मी जाणून आहें कटुकवृत्ति शीघ्र सुधारणेच्या आड येते, पण निराशेच्या खड्ड्यात कधींच पडू देत नाहीं.

बस, आता लिहिण्याच्या शक्तीचा अंत आला तेव्हा पुरें करतों

मला स्वत:च्या सुखदुःखाविषयीं बोलण्या लिहिण्याची सवय नव्हती ती या आजारीपणात लागली आहे. तिचेकडे लक्ष देण्यासारखें नाहीं. प्रकृतीस जपा, नाहींतर माझेशीं तोडा.

—काका

# देशमुख आणि कंपनीचीं आगामी प्रकाशनें

### वि. स. खांडेकर

अश्रु
युद्ध आणि हिटलर
चल ये राणी
चार भिंती
विसावें शतक
तिसरी भूक
वर्षाकाल
छाया भाग १ व २
वालुका
बडी माँ
१९४२
चक्रवर्ति
उद्यांचीं स्वप्नें
वटपत्रें
साहित्य–साधना
शामचीं पत्रें

### ग. त्र्यं. माडखोलकर

टांक
हें युद्ध
तीन दिवस
माझे आवडते कवि
उर्वशी
चक्रवर्ति उदयन
स्वप्नांतरिता
उमर खय्याम

### द. र. कवठेकर

दगाआड
आग आणि पाणी
वितळलेल्या भावना

### प्र. के. अत्रे

'मी', कमा झालों !
(लघुकथा)

### ना. धों. ताम्हनकर

शेजारी

### गोपिनाथ तळवलकर

१९४२ आणि नंतर

### कृष्णाबाई मोटे

मवाली
गुणाची पोर

### साने गुरुजी

स्वर्गीय ठेवा

### काकासाहेब कालेलकर

स्मरणयात्रा

### चिं. वि. जोशी

दरबारकथा
आजीबाई
माणुसकी

### दत्तू बांदेकर

हिरवी माडी
कबुलीजबाब
गडी फू
मोहनिद्रा

### अनंत काणेकर

काळें आणि पांढरें
गिब्रानच्या कथा

### शकुंतला परांजपे

चांदणी
घरचा मालक

### एम्. एल्. दांतवाला

गांधीवादाचा फेरविचार